सागर साहित्य : : : : २३

# द्राक्षांच्या देशांत

## ( सफर पाहिली )

संपादक
बा. द. सातोस्कर, बी. ए.

मुंबई, १९४४ किंमत रु. २।

मुद्रक: **एम्. आर. कालेवार,** प्रफुल्ल प्रिंटिंग प्रेस, नानाशंकरशेटवाडी,
३८०, गिरगांव रोड, मुंबई, नं. २

प्रकाशक: **बा. द. सातोस्कर,** बी. ए., सागर साहित्य कार्यालय,
त्रिभुवन रोड, मुंबई ४

---



---

चित्रकार: **रघुवीर शं. मुळगांवकर,** तुळशी बिल्डिंग, खेतवाडी
बॅकरोड, मुंबई ४

एकमेव विक्रेते: **महाराष्ट्र ग्रंथभांडार,** पार्तुगीज चर्चजवळ
गिरगांव, मुंबई ४

# प्रवेश

‘ द्राक्षांच्या देशांत ’ हा कथासंग्रह वाचकांच्या हातांत देतांना पुष्कळ दिवस मनांत बाळगलेली एक कल्पना प्रत्यक्षांत आलेली पाहाण्याचें समाधान मला लाभत आहे. मराठी मासिकांतून मधून मधून येणाऱ्या पोर्तुगीज कथांच्या अनुवादानें त्या भाषेंतील कथावाङ्मयाविषयींचें एक कुतूहल मराठी वाचकांत उत्पन्न झालेलें मी पाहिलें होतें. अन् नंतर ‘तीन तरुणी’ या श्री. रायकरांनीं भाषांतरित केलेल्या व आम्ही प्रसिद्ध केलेल्या कादंबरीनें तें कुतूहल वाढीला लागलें असल्याचेंही मला दिसत होतें. अन् तेव्हांपासूनच पोर्तुगीज ललित साहित्याचा परिचय यथातथ्य अनुवादाच्या द्वारा मराठी वाचकांना करून द्यावा असें मी मनाशीं ठरविलें होतें. दोन्ही भाषांवर सारखेंच प्रभुत्व असलेल्या माझ्या कांही लेखक–मित्रांशीं याबाबत मी चर्चा केली होती. पोर्तुगीज भाषेंतील अद्यावत् ग्रंथसंभार नजरेखालीं घालून त्या भाषेचा गेलें एक तप सुटलेला सांधा उत्कृष्ट निवड करायला उपकारक होईल म्हणून मी पुनश्च जुळवीत आणला होता. सर्व दृष्टींनीं पूर्वतयारी करण्यांत मनांत कल्पना आल्यापासून आजपर्यंतचा काल व्यतीत झाला. अन् नुकतीच कुठें या पुस्तकाच्या प्रकाशनानें या कार्यास सुरवात झाली आहे.

ललित साहित्यमंदिरांतलें कथा-साहित्य हें एक प्रमुख व दर्शनी दालन आहे ही गोष्ट सर्वमान्य आहे. किंबहुना या मंदिरांत कुणीही मुशाफीर बिनधोकपणें प्रवेश करूं शकेल असें तें महाद्वार आहे असें म्हटल्यास अधिक शोभेल. अन् या महाद्वारानेंच पोर्तुगीज साहित्याच्या अंतर्भागापर्यंत प्रवेश करणें सुलभ होणार आहे. या कल्पनेनें कथासाहित्याचा अनुवाद प्रसिद्ध करण्याचें काम मी प्रथम हातांत घेतलें.

अर्थात ‘ द्राक्षांच्या देशांत ’ हें प्रस्तुत पुस्तक संपूर्ण किंवा स्वयंपूर्ण नाहीं. हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. पोर्तुगीज कथासाहित्याचें हें उडतें विहंगमा-लोकन आहे. पोर्तुगालांत–द्राक्षांच्या देशांत केलेली ही पहिली व धांवती सफर आहे. सिंदबादच्या लोकविश्रुत सात सफरींप्रमाणेंच सातां समुद्रापलीकडलि या

फिरंगी प्रदेशांत निदान दोन चार सफरी केल्यानेंच तेथील द्राक्षांची खरी गोडी आपल्याला चाखायला मिळणार आहे. या एका सफरीनें आपल्याला हा द्राक्षांनीं व द्राक्षकन्यांनीं भरलेला प्रदेश जवळून पाहिल्याचें समाधान मिळेल. पण दृढ परिचय झाल्याचा आनंद मिळणार नाहीं. त्यासाठीं अधिक सफरी केल्या पाहिजेत– 'द्राक्षांच्या देशांत'चे अधिक खंड प्रकाशित झाले पाहिंजेत.

अन् याच बाबतींत वाचकांचें मला सहकार्य हवें. केवळ वानगीदाखल म्हणून हा छोटा संग्रह मी प्रसिद्ध करीत आहें. वाचकांना तो आवडल्याचें प्रमाण मला मिळालें तर त्यापुढील भाग मी यथावकाश प्रसिद्ध करणार आहें.

प्रस्तुत संग्रह संपूर्ण किंवा स्वयंपूर्ण नाहीं हें विधान एकापेक्षां अनेक अर्थांनीं खरें आहे. पहिली गोष्ट ही कीं पोर्तुगीज कथासाहित्यांत एकेकाळीं किंवा सध्या आघाडीवर असलेल्या सर्वच लेखकांचा त्यांत समावेश केलेला नाहीं. अवघेच लेखक त्यांत दिसतील. पण पुढील भागांत त्यांचा अंतर्भाव होईल हें न सांगतांही समजण्यासारखें आहे.

दुसरी गोष्ट ही कीं जे लेखक यांत दिसतात त्यांपैकीं प्रत्येकाच्या गोष्टींची संख्या पाहिल्यास प्रमाणभंग केल्याचा दोष पदरीं येतो. ज्यूलियु दांतश यांच्या गोष्टी बहुसंख्येनें तर जुआंव ग्राव्हि किंवा कुएल्यु नॅतु यांसारख्या लेखकांची अवघी एकेकच गोष्ट दिसते. याला उत्तर असें, कीं एका लेखकाचा एका भागांत समावेश झाला तर दुसऱ्या भागांत समावेश होणार नाहीं असें नव्हे. सध्याच्या युद्धपरिस्थितींत त्या त्या लेखकांचीं पुस्तकें मिळण्याची सुलभता या गोष्टीला कारणीभूत झालेली आहे. ज्यूलियु दांतश हा पोर्तुगिज कथासाहित्यांत आज अग्रेसर असून आमच्या खांडेकरांप्रमाणें विपुल साहित्यनिर्मिति करीत आहे. पोर्तुगीज जाणणाऱ्या व वाचनभिरुची असलेल्या प्रत्येकाला तो सुपरिचित आहे. अन् म्हणून साहजिकच त्यांच्या गोष्टींच्या अनुवादांची संख्या या पुस्तकांत जास्त दिसते.

तिसरी गोष्ट अशी कीं लेखकांचा अनुक्रम लावतांना किंवा गोष्टींची निवड करतांना कोणत्याही तऱ्हेचा विशिष्ट दृष्टीकोन वापरलेला नाहीं. जुन्या काळचे लेखक पहिल्या पहिल्या भागांत घेऊन अगदीं आधुनिक लेखक शेवट शेवटच्या भागांत घेतले असते तर पोर्तुगीज कथासाहित्याच्या तंत्रांत व मंत्रांत कसकसा फेरबदल

होत गेला हें वाचकांना दिसून आलें असतें, किंवा स्थलकालपरिस्थितीचें प्रतिबिंब कथावाङ्मयांत पडत असल्यामुळें कालानुक्रमानें कथालेखकांना स्थान दिलें असतें तर पोर्तुगालमध्यें त्या त्या कालांतील समाजस्थितींत फरक पडला किंवा काय, किंवा पडला असला तर तो कसला हें वाचकाला समजून आलें असतें.

या मुद्यांतील पूर्वभागाविषयीं स्पष्टीकरण करायचें तर तें असें कीं ॲस द केय्रॉज, कामील्उ कास्तॅल्उ ब्रांकु, इ. पोर्तुगीज कथासाहित्याच्या जन्मकालच्या जमान्यांतील लेखक घेऊन ' द्राक्षांच्या देशांत ' चा पहिला खंड सजविला असता तर त्याचें अर्धें नावीन्य नष्ट झालें असतें. आपल्याकडील हरी नारायण आपटे प्रभृति मराठी कथासाहित्यांच्या बाल्यकालांतील लेखकांप्रमाणेंच याहि लेखकांत पाल्हाळ, भावना पिंजून काढणें, प्रसंगांचें वैपुल्य, भाषेची क्लिष्टता, इ. आजच्या लघुकथेच्या तंत्राला मारक असें दोष असल्यामुळें, केवळ कालानुक्रम साधण्यासाठीं असा संग्रह काढला असता तर तो आजच्या वाचकाला खासच आवडला नसता अन् मग पुढील भाग काढण्याचें बाजूला राहून हा खटाटोप व्यर्थच झाला असता. शिवाय हा दृष्टिकोन आपल्या स्वतःच्या मातृभाषेंतील कथांचें संकलन करतांना तेवढा विशेष कसोशीनें वापरणें जरूर असतें. आपल्या भाषेंत एकाद्या वाङ्मयप्रकाराचा जन्म केव्हां झाला, तो कोणी जन्माला घातला, त्याला कुणी हातभार लावला, त्याच्या तंत्रांत, विषयांत, मांडणींत कसकसा बदल होत गेला, त्या वाङ्मयप्रकाराच्या सुरवातीपासून आतांपर्यंत ज्या ज्या लेखकांनीं तो हाताळला त्यांनीं त्याला कशी कलाटणी दिली, त्यांचीं स्वतःचीं वैशिष्ट्यें काय होतीं हें समजून घेण्याचें काम ती मातृभाषा असलेल्या प्रत्येक वाचकानें केलें पाहिजे. गुजराती, हिंदी, बंगाली सारख्या आपल्या शेजारच्या भाषांतील किंवा इंग्रजी सारख्या आपल्या प्रत्यक्ष जीवनावर परिणाम करणाऱ्या परभाषेंतील प्रातिनिधक स्वरुपाचा कथासंग्रह प्रसिद्ध करतांना एक वेळ हा दृष्टिकोन वापरतां येईल. पण पोर्तुगीज सारख्या भाषेंतील कथा निवडतांना कालानुक्रम साधण्याची गरज होती असें मला वाटत नाहीं.

समाजस्थितींतील बदल समजून घेण्यासाठीं कालानुक्रम राखण्याची जरुरी होती हेंही विधान मला वरील कारणांसाठींच पटत नाहीं. शिवाय एखाद्या राष्ट्रांतील समाजाचा प्रत्यक्ष किंवा इतर ग्रंथांच्या द्वारें परिचय असल्याशिवाय विशिष्ट काल-

खंडांत लिहिल्या गेलेल्या ललित साहित्यांत सामाजिक चालीरितींनें जें प्रतिबिंब पडतें त्यांतील सूक्ष्म फरक परक्या राष्ट्रांतील वाचकाला आकलन होत नसतो. या परराष्ट्रांतील पन्नास वर्षांपूर्वीची एकादी सामाजिक परिस्थिति आपल्याला जितकी अपरिचित असते तितकाच पन्नास वर्षांनंतर त्यांत झालेला बदलही अपरिचित असतो.

अन् या दोन्ही कारणांसाठीं. विशिष्ट कालानुक्रमाची मर्यादा या संग्रहांत पाळण्यांत आलेली नाहीं.

प्रस्तुत पुस्तक स्वयंपूर्ण व संपूर्ण नाहीं हें सांगतांना इतका प्रपंच करावा लागला. परंतु एका बाबतींत तो संपूर्ण आहे हें वाचकांच्या लक्षांत आणून देणें मला अवश्य वाटतें. ती बाब ही. कीं यांतील प्रत्येक गोष्ट स्वयंपूर्ण व संपूर्ण आहे. आपल्याकडील एकाद्या लेखकाच्या निरानिराळ्या गोष्टींचा किंवा विविध लेखकांच्या कांहीं गोष्टींचा जसा संग्रह असतो तशा स्वरुपाचा हा संग्रह आहे. 'द्राक्षांच्या देशांत'-चे पुढील भाग दुर्दैवानें निघाले नाहींत [ तशी स्थिती वाचकांच्या उत्तेजनानें व सहकार्यानें येणार नाहीं अशी मला आशा व खात्री वाटते. ] तरींही या पहिल्या भागास त्यामुळें कांहीं बाध येणार नाहीं. पोर्तुगीजसारख्या परभाषेंतील कथा-वाङ्मयाची जुजबी ओळख व कांहीं उत्कृष्ट व सर्वसामान्यपणें मराठी वाचकांच्या वाचनांत येणाऱ्या गोष्टींपेक्षा कांहीं बाबतींत निराळ्या वाटणाऱ्या गोष्टी वाचल्याचें समाधान या संग्रहाच्या वाचकांना खास मिळेल, अशी मला जबर आशा आहे.

वर जीं या पुस्तकाचीं अकरणात्मक वैशिष्ट्यें सांगितलीं, त्याचबरोबर दोन तीन करणात्मक वैशिष्ट्येंही सांगणें मला जरूर वाटतें. यांपैकीं पहिलें वैशिष्ट्य हें कीं एका दृष्टीनें हा संग्रह प्रातिनिधिक आहे. एकंदर पोर्तुगीज कथासाहित्याचें प्रतिनिधित्व त्यांत दिसणार आहे असें म्हणण्याचा माझा उद्देश नाहीं. तर त्या त्या लेखकांचे गुणविशेष त्यांच्या त्यांच्या गोष्टींतून प्रतीत होत आहेत, इतक्या-पुरतेंच हें माझें विधान आहे. ज्यूलियु दांतश किंवा आव्गूस्तु द कॉश्त यांच्या गोष्टींची विपुलता असल्यामुळें त्यांच्या सर्व गोष्टी वाचल्यानंतर त्यांचीं वैशिष्ट्यें काय आहेत हें वाचकाला सुलभपणें समजून येईलच. पण जुआंव प्राव्हि प्रभृति लेखकांची एकेक गोष्टच जरी निवडली असली तरी त्या त्या लेखकाचे गुणविशेष

ज्या गोष्टींत प्रकर्षानें सामावलेले आहेत तीच निवडण्याची काळजी घेण्यांत आलेली आहे. कदाचित ती गोष्ट त्या लेखकाची उत्कृष्ट नसेल. त्यापेक्षां एखाद्या बाबतींत सरस गोष्टी त्यानें लिहिल्या असतील. पण मध्यवर्ति कल्पनेचा निवड, तिची रचना, व या रचनेचें त्या लेखकाचें खास तंत्र ज्या गोष्टींत विशेषत्त्वानें दिसलें अशी एकच गोष्ट निवडण्याचें धोरण मी ठेवलें. ज्या लेखकांच्या अशा एक दोनच गोष्टी घेतलेल्या आहेत त्या गोष्टी वाचून त्या लेखकाबद्दल जी कल्पना चोखंदळ वाचक करतील ती सहसा चूक होण्याचा सुतराम् संभव नाही.

'द्राक्षांच्या देशांत'चें दुसरें वैशिष्ठ्य जें मला सांगावयाचें आहे तें हें कीं एकाद दुसरा अपवाद सोडून हें सर्व वाङ्मय ताजें आहे. आजच्या पोर्तुगीज कथावाङ्मयाची कल्पना या छोट्या पुस्तकावरून वाचकांना चांगली होण्यासारखी आहे. सर्व लेखकांचें प्रतिनिधित्व स्वीकारण्याची जबाबदारी या छोट्या संग्रहानें पत्करलेली नसली तरी त्यांत आलेल्या थोड्याच लेखकांच्या लिखाणावरून इतर विद्यमान लेखकांच्या कथासाहित्याची कल्पना होण्याच्या मर्यादित अर्थानें प्रस्तुत संग्रहाला प्रातिनिधिक खास म्हणतां येईल. जुआंव ग्राव्हि सारखा एकाददुसरा अपवाद वगळला तर इतर लेखक हे आजच्या पोर्तुगीज कथालेखकांचे प्रतिनिधी म्हणून त्यांच्या गुणदोषांचीं अधिकारपत्रें घेऊन द्राक्षांच्या देशांत वावरत आहेत. ज्यूल्यिु दांतश हा वयानें वृद्ध आहे खरा, पण लिखाणांत अजूनही जवान आहे. अन् नव्या युगाच्या बरोबरीनें पाऊल टाकीत आहे. तर मग या संग्रहावरून पोर्तुगीज कथा-साहित्याचे कोणते गुणविशेष वाचकाला दिसून येतात? वाचकांनीं आपआपल्या कल्पनेप्रमाणें ते हुडकून काढणें जास्त बरें. केवळ दिग्दर्शन म्हणून एकदोन गुणांचा उल्लेख इथें करणें अस्थानीं होणार नाहीं.

लघुता हें आजच्या पोर्तुगीज कथासाहित्याचें एक महत्वाचें गुणवैशिष्ठ्य आहे. आपल्याकडील सर्व लेखकांच्या गोष्टींची लांबी मोजून त्याची सरासरी काढली अन् तशीच पोर्तुगीज कथांची सरासरी काढली तर पहिल्यापेक्षां दुसरी किती तरी कमी भरेल. तर मग पोर्तुगीज लेखक मोठ्या गोष्टी कधीं लिहीत नाहींत का? असें नव्हे. मोठ्या गोष्टीही असतात. पण त्यांची लांबी फार मोठी नसते. दीर्घ-कथांचाही ( novelas ) त्यांच्यांत एक प्रकार प्रचलित आहे. पण तो आजच्या

गोष्टीच्या–लघुकथेच्या तंत्रांत बसूं शकत नाहीं. प्रसंगांचें वैपुल्य, चढ, उतार, विभाग वगैरे बाबतींत त्यांचें लघुकथेपेक्षां कादंबरीशींच जास्त साम्य असतें. बोकिलांची बेबी, सुखठणकरांची जाईजुई, किंवा कवठेकरांची मंदा, यांच्याशीं त्यांची तुलना करतां येईल. आपल्याकडे हा प्रकार अजून लोकप्रिय व्हावयाचा आहे.

लघुतेबरोबरच गोष्टीचा अनपेक्षित, वाचकाला धक्का देणारा शेवट करणें हेंही एक पोर्तुगीज लघुकथेचें खास वैशिष्ठ्य आहे. पहिली रात्र, सत्य आणि स्वप्न, स्त्रियांचीं पत्रें, कुरळे केस, चाळिशीचें अंतर, या गोष्टी वाचल्या म्हणजे वाचकाला हें समजून येईल. गोष्टीच्या सुरवातीलाच शेवट काय होईल हें मराठी गोष्टीच्या वाचकाला ओळखतां येतें. पण या पोर्तुगीज गोष्टीच्या शेवटाला सुरवात झाली तरी शेवटच्या कलाटणीचा सुगावा वाचकाला लागूं शकत नाहीं.

द्राक्षांच्या देशांत द्राक्षरस व द्राक्षकन्या यांचा सुकाळ असला तर त्यांत मराठी वाचकांनी बिचकायला नको. या गोष्टींचें हस्तलिखित वाचलेल्या माझ्या एका रसिक मित्रानेंही तक्रार केली कीं यांत चुंबन–आलिंगन व मदिरापान यांचा अतिरेक आहे. मराठी संस्कृतीला परदेशी दारूचा सुरुंग लावायचें हें छुपें कारस्थान आहे, असें म्हणण्याइतका जरी तो पुढें गेला नाहीं तरी अग्न्युपासक धर्ममार्तंडांचें डोकें फिरविण्याइतका चुंबनांचा आवाज व दारूचा दर्प त्यांत असावा. पण त्याला माझा किंवा आमच्या धर्ममार्तंडांचाही इलाज नाहीं. इतर जागतिक वाङ्मयाचा व्यासंग असलेल्या कांहीं पोर्तुगीज टीकाकारांनी या गोष्टींवर टीकाही केली आहे नी त्यांचें समर्थनही केलें आहे. पोर्तुगाल या राष्ट्राची ती प्रकृति आहे. आनंदी, स्वास्थ्यपूर्ण, सुखासीन जीवनाचें तें प्रतिबिंब आहे. आजच्या जागतिक युद्धांत जगांतलीं लहानमोठीं सर्व राष्ट्रें गुंतलीं असतांना पोर्तुगाल शांतिकालांतच शक्य असलेलीं प्रदर्शनें भरवितें, किंवा गेल्या महायुद्धांत तर जागतिक वाङ्मयाला दलित वर्गाच्या सहानुभूतिपर अशी एक निराळीच कलाटणी मिळाल्याचें पाहूनही ज्या देशांतील वाङ्मयांत त्याचा सुगावाही सांपडत नाहीं त्या पोर्तुगाल देशांतील कथांचा हा अनुवाद आहे हें वाचकांनी लक्षांत ठेवलेलें बरें.

पण या कथांच्या गुणदोषविवेचनपर मी अधिक लिहूं इच्छीत नाहीं. द्राक्षांच्या देशांतील सर्व संकल्पित सफरी पुऱ्या झाल्या म्हणजे एक विस्तृत

सांगोपांग रसग्रहणात्मक निबंध पोर्तुगीज वाङ्मयाचा दीर्घ व्यासंग असलेल्या एका विद्वानाकडून लिहवून घेऊन मी शेवटच्या भागाला जोडणार आहें. अन् म्हणूनच आणखी गुणदोषात्मक विधानें करून त्यांचा मार्ग मी बिकट करून ठेवूं इच्छीत नाहीं.

प्रस्तुत पुस्तकापुरतेंच आणखी थोडें सांगावयाचें म्हणजे तें अनुवादाविषयीं. यांतील बहुतेक सर्वच कथांचा अनुवाद करतांना मुळाला धक्का लावलेला नाहीं. हें रूपांतर तर नव्हेच, पण स्वैर भाषांतरही नव्हे. शक्य तों मूळांतील कथावस्तूला, वातावरणाला, भाषेला, कल्पनेला, व वाक्याच्या रचनेला बाधा न होईल अशी काळजी प्रत्येक अनुवादकानें घेतलेली आहे. ' सागर साहित्या'तर्फे प्रकाशित होणाऱ्या अनुवादित वाङ्मयाविषयींच्या कांहीं कल्पना मी माझ्या मनाशीं योजून ठेवल्या आहेत. त्यांचें स्पष्टीकरण मी आमच्या याच पुस्तकाबरोबर निघणाऱ्या दुसऱ्या एका पुस्तकांत केलें आहे. आणि म्हणूनच मूळ कथांची ही प्रामाणिक प्रतिकृति आहे इतकेंच म्हणून मी पुढें जातों.

' द्राक्षांच्या देशांत ' सफर करण्यास माझे कांही लेखक-मित्रही माझ्याबरोबर आले, नी त्यांच्या सहकार्यानें हा प्रवास मोठ्या मजेंत पार पडला हें मला मुद्दाम नमूद करून ठेवावेंसें वाटतें. श्री. जयवंतराव सरदेसाई, श्री. व्यं. अ. पै रायकर, श्री. ' परिचित ' यांच्यासारखा दोन्ही भाषांवर सारखेंच प्रभुत्व असलेल्या लेखकांनीं मला जें सहाय्य केलें तें आभार मानून मोकळें होण्याइतकें साधें नाहीं. श्री. घोडे, नाईक यांनीही एकेका गोष्टीचा अनुवाद करून देऊन मला ऋणी केलें आहे. आणि आमचे चित्रकार मित्र श्री. मुळगांवकर यांनीं आपल्या नेहमीच्या कौशल्यानें या पुस्तकाचें बाह्यांग सजविण्याचें मनावर घेतलें म्हणूनच द्राक्षांच्या देशाची कल्पना पुस्तक केवळ हातांत घेऊनच वाचकाला करतां येते.

प्रफुल्ल प्रेसमधील लोकांचे व आमचे एकमेव विक्रेते शं. वा. कुळकर्णी यांचेंही सहकार्य या कामीं मिळालें, याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

त्रिभुवन रोड, मुंबई,
ता. २४-९-४४

बा. द. सातोसकर

# पहिली रात्र

( आज लिलीचा लग्न दिवस. लिली आपल्या खोलींत कानांत मोत्यांची कर्णभूषणें घालीत आरशासमोर उभी आहे. लिली–एक अठरा वर्षांची छोकरी, चलाख, आनंदी, किंचित् पुरुषी दिसणारी, गुलाबी रंगाच्या खड्याप्रमाणें चमकणारा शरीराचा रंग, लहानसेंच नाक, सोनेरी केस, थोडीशी बालीश, एकंदरींत सुंदर. लिलीची आई सोफ्यावर बसून हातमोजे चढवींत आहे. तिचे डोळे पाण्यानें भरून येऊं पाहात आहेत )

आई—लिली !

लिली—ममा !

आई—खूप खूप बोलायचं आहे मला तुझ्याशीं.

लिली—हं, ममा !

आई—चर्चमध्यें जायच्यापूर्वीं मला सांगायचं आहे तें तुला. आणि तूं तें फार गंभीरपणें ऐकून घ्यावंस अशी माझी इच्छा आहे.

लिली—बाहेर गाडी थांबली आहे, आई.

आई—अजून अर्धा तास अवकाश आहे, लिली. तेवढा वेळ पुष्कळ झाला आपल्याला.

लिली—हीं तुझीं मोतीं माझ्या कानांत शोभतात ना आई ?

आई—अगदीं रतीसारखी दिसतेस तूं, लिली !

लिली—पण मी तरी तुझीच मुलगी ना आई ?

(आई मुलीचा मुका घेते. लिली कोचावर आईच्या शेजारीं बसते. कांहीं क्षण शांतता. )

आई—लिली...

लिली—ममा.

आई—माझ्या लग्नाच्या दिवशीं तुझ्या आजीनं जें मला सांगितलं होतं तेंच मी तुला आतां सांगणार आहें.

लिली—अठरा वर्षांपूर्वीची गोष्ट का ?

आई—छे ! एकोणीस वर्षांपूर्वीची.

लिली—आणि तुला ती अजून आठवते आई ?

आई—आईनं सांगितलेल्या गोष्टी आपण कधीं विसरत नसतों, मुली. पाहशील. तुला जेव्हां मुलगी होईल तेव्हां पाहाशील तूं.

लिली—मला मुलं होणार नाहींत, ममा !

आई—हें काय भलतंच बोलतेस तूं लिली ? तुला मुलं न व्हायला काय झालं ?

लिली—पण नाहीं व्हायचीं, ममा.

आई—कारण ?

लिली—मला मुलं नकोत म्हणून सांगितलं आहे मी आंतोनला.

आई—पण मुलं होणं न होणं हें कांहीं आपल्या हातांत नसतं माझ्या छबडे ! आई मेरीला तुझी आठवण झाली तर खात्रीनं तूं आई होशील.

लिली—सुदैवानं तिला आठवण न झाली तर बरं होईल.

आई—आपला स्त्रियांचा हा पत्नीधर्म आहे, मुली. एवढ्यासाठींच मी लग्न केलं. एवढ्यासाठींच तुझं लग्न करायचं आहे.

लिली—ह्या एका कारणासाठीं कां मला लग्न करायचं आहे ?

आई—अर्थात्.

लिली—मला कुणीही हें कधीं सांगितलं नाहीं.

आई—मी सांगतें ना तुला तें आतां ! कालपर्यंत तूं पोर होतीस, उद्यां तूं पत्नी होणार आहेस.

लिली—आणि आई, आज कोण आहें मी ?

आई—आज नवरी आहेस तूं लिली.

लिली--पण फरक काय यांत ?

आई--( गोंधळून ) थोडा...

लिली --आजीनं सांगितलं नाहीं वाटतं तुला तें ?

आई--नाहीं. कांहीं गोष्टी लहान वयांत समजण्यासारख्या नसतात आपल्याला.

लिली--पण तूं तर मोठी आहेस ना ? तुला त्या समजल्या आहेत ना ?

आई--नी तुला सुद्धा समजतील त्या, बरं का ! तुझा नवरा तुझ्या कानांत जें कांहीं गुपित सांगेल तें कधींही विसरणार नाहींस तूं...

लिली--चावटपणाशिवाय त्याला कांहीं बोलतांच येत नाहीं, ममा.

आई--ह्या चावटपणांतच आपलं सुखसर्वस्व सांठवलेलं असतं, माझ्य लाडक्या मुली. ( तिला आपल्याकडे ओढून ) ऐक......

लिली--किती उशीर झाला, ममा.

आई--माझे दोन शद्ब ऐकून घे आज. आपल्या नवऱ्याच्या नेहमीं आज्ञेंत राहिलं पाहिजेस तूं. आणि आज तर त्याचा शद्ब सुद्धां खालीं पडूं देऊं नकोस...

लिली--पण आजच काय विशेष आहे, आई ?

आई--कारण आज तुझ्या लग्नाचा पहिला दिवस आहे ना ?

लिली--आणि त्यानं माझं ऐकणं हें त्याचं कर्तव्य नाहीं वाटतं ?

आई--तशी रीत नाहीं लिली.

लिली--पण समान हक्काचं युग आहे ना हें ? आणि तुला माहीत आहे ना आई कीं आम्हां दोघांपैकीं मीच त्याच्यावर अधिकार गाजवतें ?

आई--होय. तें मला माहीत आहे मुली. पण तो तुझं ऐकतो तें केवळ त्याचा स्वभावच तसा आहे म्हणून. किती सुसंस्कृत आहे तो ! नी किती प्रेम करतो तुझ्यावर ! किती मिळतं घेतो तो तुझ्याशीं !

लिली--मुळींच नाहीं मिळतं घेत !

आई--कां बरं ?

लिली--नाहीं घेत म्हणतें ना मी ?

आई--पण हें कांहीं कारण नव्हे !

लिली--मग मला आवडत नसलेलं घरच कां बरं घेतलं असतं त्यानं ?

आई—इस्तोरीमधलं घर तुला आवडत का नाहीं?

लिली—नाहीं.

आई—माझ्यापासून फार दूर राहायला जावं लागेल, म्हणून वाटतं?

लिली—छे! छे! त्यासाठीं नव्हे आई!

आई—मग कशासाठीं बरं?

लिली—मी म्हणत होतें, दोन झोपायच्या खोल्या असलेलं तें दुसरं घर घे म्हणून. पण त्यानं कांहीं ऐकलं नाहीं तें. एकच झोपायची खोली असलेलं घर घेतलं त्यानं.

आई—पण तूं तुला स्वत:करतां घेणार असलेली खोली कांहीं चांगली हवेशीर नव्हती!

लिली—पण ती मी माझ्यासाठीं कुठं वापरणार होतें? त्याला देणार होतें मी ती.

आई—पण संधिवात झाला असता ना त्याला त्या खोलींत झोपल्यामुळं!

लिली—काय सांगतेस तूं आई! संधिवात! तीस वर्षांच्या तरुण वयांत संधिवात का झाला असता त्याला? संधिवाताची भीति असलेल्यानं लग्नच मुळीं कां करावं?

आई—पण माझी नी तुझ्या वडिलांची एकच खोली नाहीं का, लिली?

लिली—पण तींत दोन खाटा आहेत ना? आणि याला पाहिजे म्हणे डबल कॉट!

आई—पण त्यांच्या घराण्याची रूढी आहे तशी. आणि अशा रूढीला—परंपरेला आपण मान दिला पाहिजे, माझ्या मुली!

लिली—पण आई, तुला ठाऊक आहे ना, कुणाही परक्या पुरुषाच्या सोबतीनं झोपायची मला संवय नाहीं ती?

आई—ही पद्धत झाली का बोलायची लिली! तुझा नवरा म्हणजे कुणी परका पुरुष नव्हे!

लिली—पण माझी इच्छा नाहीं तशी. बस, खलास!

आई—पण माणसानं थोडा विचार करायला नको का? तूं आतां पत्नी होणार आहेस त्याची.

लिली—हो, मी त्याची पत्नी होईन खरी. पण ती केव्हां? सकाळीं उठलें म्हणजे मग! रात्रीं झोंपेंत असतांना नव्हे! अगदीं ठरवूनच टाकलंय मी. नी आंतोनला सुद्धां माहीत आहे तें.

आई—काय म्हणतेस पोरी तूं? त्याला तूं सांगितलं आहेस हें?

लिली—हो, केव्हांच.

आई—अन् मग काय म्हणाला तो?

लिली—म्हणाला, कीं माझं हें मत कांहीं कायम राहायचं नाहीं. लवकरच बदलेन मी तें.

आई—हो. मला सुद्धां तसंच वाटतं.

लिली—चल्ल, मला हंसतेस तूं आई!

आई—अजून छोकरी आहेस तूं माझ्या बाबी!

लिली—पण मला पर्वा नाहीं त्याची. मी केव्हांच ठरवून टाकलं आहे काय करायचं तें.

आई—काय ठरवलं आहेस तूं? मला नाहीं का सांगायचं?

लिली—चल जा! आमचं गुपित आहे तें.

आई—माझ्यापासून सुद्धां लपवून ठेवण्यासारखं आहे का तें?

लिली—एकोणीस वर्षापूर्वी माझ्या आजीनं तुला काय बरं सांगितलं होतं?

आई—तुला ऐकायचं आहे का तें?

लिली—हो ना!

आई—माझी आई म्हणाली होती कीं, आमच्या सबंध आयुष्यांतील सुख लग्नानंतरच्या पहिल्या रात्रीवर अवलंबून असतं.

लिली—( विचार करीत ) आणि आई, आयुष्यांतील हें सुख मिळवण्यासाठीं तूं काय केलंस?

आई—तुझ्या आजीचा उपदेश मी आचरणांत आणला.

लिलीचे वडील—( दरवाजाच्या आंत पाऊल टाकीत ) अजून तुमची तयारीच नाहीं का? बाहेर गाडी केव्हांची थांबली आहे.

आई—हो. चला, निघूंया कीं.

* * *

( दुसऱ्या दिवशीं सकाळीं ११ वाजण्याची वेळ. इस्तोरीलची बाग. मादाम लिली प्रसन्न, सलज्ज, समाधानी वृत्तीनें फुलें तोडीत आहे. आई येते व लिलीला जवळ घेते. )

आई—लिली.

लिली—ममा.

आई—मग लिली, कशी काय गेली तुझी कालची रात्र ?

लिली—किती सुंदर आई ! किती गूढ, किती चमत्कारिक, किती भीतिदायक कल्पना केल्या होत्या मी काल रात्रीच्या ! पण छे ! अलौकिक असं कांहींच घडलं नाहीं काल रात्रीं !

आई—तुला झोंप लागली ना चांगली ?

लिली—किती तरी चांगली ! अगदीं गाढ ! एकदां झोंपलें ती सकाळीं जागी झालें मी.

आई—बिछान्याचा नवखेपणा नाहीं ना जाणवला तुला ?

लिली—हो. खरं आहे तूं म्हणतेस तें. माझ्या पूर्वीच्या कॉटपेक्षां ही डबल कॉट किती सुरेख नी सोईस्कर आहे !

आई— ?

लिली—हात पाय कसे अगदीं हवेतसे पसरतां येतात या कॉटवर !

आई—आणि तुझा नवरा ?

लिली—त्यानं कसलाच त्रास नाहीं दिला मला !

आई—पण मग कुठं झोपला तो ?

लिली—खालीं, जमिनीवर !

लेखक—ज्यूलियु दांतश

अनुवादक—बा. द. सातोस्कर

# तीन आरसे

मी एक जुन्या पुराण्या वस्तूंचा व्यापारी आहें. माझी सारी उमर मीं याच धंद्यांत घालवली असल्यामुळें अलिकडे अलिकडे त्या निर्जीव वस्तूंची भाषा मला कळूं लागली आहे. आणि कोणाहि सहृदय व संवेदनाशील माणसास ती थोड्याच प्रयासानें कळूं लागते असें माझें मत आहे.

असाच एक दिवस मी दुकानांत गिऱ्हाइकाची वाट पहात बसलों होतों. ऐन उन्हाळ्याचे दिवस होते. आणि जवळपास कुठेंशी मोठी जत्रा असल्यामुळें राजरस्त्यांतसुद्धां विशेष रहदारी नव्हती. आणि माझें दुकान तर एका गल्लींत होतें. बारा वाजतां वाजलेल्या चर्चच्या घंटेचा आवाज अजून वातावरणांत विलीन झाला नव्हता. रस्त्यावर जाऊन पाहिलं मी; दूरपर्यंत चिटपाखरूंही फिरकत नव्हतें. दिवसभर काव काव करणारे कावळेसुद्धां विश्रांतीसाठीं सावलींत अंतर्धान पावले होते. पुन्हा येऊन माझ्या जागेवर टेकलों. आंतल्या खोलींत कुणी तरी खालच्या आवाजांत कुजबुजत होतें. त्या खोलींत मी जुनें लांकूड सामान व फर्निचर मांडून ठेवलेलें होतें. पाय न वाजवतां मी कानोसा घेतला, आणि दाराच्या किल्लीच्या भोकांतून हळूंच पाहिलें. आंत कुणीच नव्हतें. मग बोलतें आहे कोण? मी शक्य तेवढे डोळे ताणून पाहिलें. गिऱ्हाइकाला आकर्षून घ्यावें म्हणून जे तीन आरसे मी शेजारीं शेजारीं मांडून ठेवले होते तेच बोलत होते हें माझ्या नंतर लक्षांत आलें.

पहिला आरसा बराच जुना होता. तो सोळाव्या लुईच्या काळांतील असल्या-मुळें त्याला ऐतिहासिक महत्व होतें, आणि त्याकरतां मी तो प्रयासानें पैदा केला होता. त्याकरतां मला पैसेही बरेच मोजावे लागले होते. या आरशाची घडणच अशी होती कीं एखाद्या सौंदर्यवतीच्या रंगमहालांत त्यानें कांहीं काळ तरी वास्तव्य

केलें असलें पाहिजे असें पहाणाऱ्याला वाटे. त्याची चौकट जरी आतां विटकी झाली होती, तरी पण तिच्यावर केलेलें कुसरकाम अजूनहि कुणाचेंही लक्ष आपल्या-कडे वेधून घेण्यास समर्थ होतें. दुसऱ्या दोघांपेक्षां हा वयानें मोठा व आकारानें मध्यम होता.

दुसरा त्या मानानें लहान होता. याची स्थापना एका वेषभूषेच्या टेबलावर करण्यांत आली होती. त्याचा आकार लंबवर्तुळाकृति असून यानेंही कित्येक स्मरणीय ललनांना एके काळीं आपल्या हृदयांत स्थान दिलें होतें.

तिसरा आकारानें पाहिल्या दोघांचा आजोबा शोभला असता. परंतु त्याची चौकट, वेषभूषा, आणि स्थूल शरीर पाहिलें म्हणजे स्त्रीसौंदर्याचा सहवास त्याला विशेष घडला नव्हता असें अनुमान काढल्यास तें फारसें चुकीचें ठरलें नसतें.

आपापल्या जुन्या आठवणी सांगण्यांत व ऐकण्यांत ते त्रिवर्ग रंगून गेले होते. हलक्या पायांनीं मी परत फिरलों व जवळच्या एका आरामखुर्चीवर गुपाचिप पडून राहिलों. या आम्हांस निर्जीव वाटणाऱ्या वस्तूंचें अंतःकरण जीवसृष्टींचा राजा जो माणूस त्याच्यापेक्षां बरेंच विशाल व संवेदनाशील असतें तर—असा विचार माझ्या मनांत आल्याशिवाय राहिला नाहीं.

* * *

वयानें व आकारानें कनिष्ट असलेला तो वेषभूषेच्या टेबलावरील आरसा प्रथम बोलूं लागला. वय आणि वृत्ति यांच्यांत वसणारा विरोध मला चटकन् जाणवला.

आल्मेतच्या इनामदारांनीं मला प्रथम फ्रान्सहून पोर्तुगालला आणलें, आणि एका सुशोभित दिवाणखान्यांत दोन खिडक्यांमध्यें माझी त्यांनीं स्थापना केली. इनामदारांना एकुलती एक दहाबारा वर्षांची मुलगी होती. तिला संगीत शिकवण्या-करतां एक म्हातारी बाई येत असे. एक दिवस ती म्हातारी बाई मेल्याचें मला कळलें आणि थोड्याच दिवसांनीं तिच्या जागीं एक सुंदर तरुणी आली.

तिचें वय विशीच्या आसपास होतें. असलें अभिजात सौंदर्य मी जन्मांत पाहिलें नव्हतें. तिच्या दर्शनानें मला पुनीत झाल्यासारखें वाटलें. फ्रान्स देशास आपल्या स्त्रीसौंदर्याचा सकारण दिमाख आहे. परंतु असलें पवित्र व अप्रातिम सौंदर्य त्या देशांत इतकीं वर्षे घालवूनही माझ्या दृष्टीस केव्हांच पडलें नव्हतें.

पहिल्याच दिवशीं ती आली, त्यावेळीं तिची विद्यार्थिनी बागेंत खेळत होती एका मोलकरणीनें तिला माझ्या दिवाणखान्यांत आणून बसविलें. तिच्या सौंदर्यास साजणारे तिचे निष्पाप आणि सुंदर डोळे पाहिल्यानंतर ती आंधळी आहे हें कुणास सांगून सुद्धां खरें वाटलें नसतें.

"इतक्या सुंदर मुलीस देवानें दृष्टि देऊं नये ही किती दु;खाची गोष्ट आहे." माझ्याकडे पहात ती मोलकरीण पुटपुटली.

"बाई, इथं आरसा कुठें आहे?" त्या अंध तरुणीनें मोलकरणीस प्रश्न केला.

"हा इथं आहे." मोलकरणीनें तिला आरशाजवळ नेलें, त्या तरुणीनें आपल्या साईहून कोमल बोटांनीं मला चांचपडलें आणि ती पुटपुटली,

"पण मला काय करायचा आहे आरसा?" तिची मुद्रा केविलवाणी झाली होती.

थोड्याच वेळांत ती मोलकरीण इनामदारांच्या मुलीला आणावयास गेली. आणि आपल्या हातांतलें तें कसलेंसें वाद्य घेऊन त्याच्या साथींत ती गाऊं लागली. तिच्या अनुपम चेहऱ्याशीं तादात्म्य पावणारा तिचा करुण आवाज त्या प्रशांत दिवाणखान्यांत भरून गेला—खिडक्यांतून येणाऱ्या वायुलहरी आपल्या ओंजळीनें बागेंतल्या सुगंधाची खंडणीच जणुं त्या अंधमूर्तीला देत होत्या. ती आळवीत असलेले करुणरम्य स्वर आणि तिच्या चेहऱ्यावर व्यापलेला तोच भाव यांत जास्त प्रभावी कोण हें ठरविणें कठीण होतें.

इतक्यांत तिनें गायन संपविलें, आणि आपले डोळे शक्य तितके विस्फारले. तिच्या डोळ्यांत कांहींतरी चमकत होतें—मी जवळून पाहिलें, अश्रू होते ते. निष्ठुर देवाची आणि त्याहीपेक्षां तिच्या निर्दय दैवाची मला जास्त तिडीक आली. इतक्या सुंदर डोळ्यांच्या नशिबीं अश्रुविमोचनाशिवाय कांहींच असूं नये, या गोष्टीचा सात्विक संताप कोणा सहृदयाला येणार नाहीं?

कांहीं तरी आठवल्याप्रमाणें ती उठली आणि माझ्या अनुरोधानें चालूं लागली.

अरेरे, गरीब बिचारी! माझ्याकडून तिला काय मिळणार होतें? मुक्तहस्तानें आल्यागेल्याला कांहींही भेदभाव न ठेवतां ज्याचें त्याचें स्वरूप दाखविण्यांत मी केव्हांही कसूर केली नाहीं, पण त्या कारुण्याच्या पुतळीला, सौंदर्याच्या देवतेला तिचें अनुपम लावण्य मला दाखवतां येऊं नये ना? माझा कांहींच उपयोग तिला

होऊं नये ना ?

चांचपडत, चांचपडत तिनें मला गांठलें. माझी त्या मानानें ओबडधोबड असलेली बैठक तिनें आपल्या सुकुमार हातांनीं धरली आणि आपलें मस्तक शक्य तितकें माझ्याजवळ आणून आपलें सौंदर्य न्याहाळण्याचा विफल प्रयत्न करून पाहिला, आणि शेवटीं निराश होऊन तिनें माझ्यावर मस्तक टेकलें व अश्रू ढाळावयास सुरवात केली. तिच्या खोल व उष्ण सुस्काऱ्यांनीं माझें हृदय व डोळे भरून आले. मला जवळचें सुद्धां दिसेना.

" मला पहायचं आहे—माझं स्वरूप मला एकदां तरी पाहूं द्या ! " निराशातिरेकानें ती पुटपुटली.

स्वतःच्या सौंदर्याच्या जाणीवेस पारखी झालेली गरीब पोर ! निसर्गानें जें तिला दिलें नाहीं तें मी तरी कुठून देणार ?

चुरगाळलेल्या जातिपुष्पाप्रमाणें तिनें माझ्यावर अंग टाकलें. त्यावेळीं तिचे अश्रू पुसावे, तिचें सांत्वन करावें, तिला कुरवाळावें असें मला कितीतरी वाटलें. परंतु माझ्या दैवानें तेंही भाग्य मला दिलें नव्हतें. मला हात नाहींत ही जीव जाळणारी जाणीव मला त्या दिवशीं सगळ्या आयुष्यांत पहिल्या प्रथम झाली.

ती सगळी रात्र मी रडून काढली—सकाळीं माझ्या देहावरून ओघळणारे अश्रुबिंदु माझे कीं त्या कालच्या अंध तरुणीचे होते तें मलाच कळत नव्हतें.

* * *

आतां सोळाव्या लुईच्या काळांतील तो आरसा बोलत होता.

आम्हां आरशांचा एक जन्मसिद्ध स्वभाव आहे आणि तो म्हणजे आम्ही सत्यवचनी आहोंत. चुकूनसुद्धां खोटें न बोलणें हा आमचा उपजत गुण,—किंवा दोष म्हणा हवं तर—आणि जातिवंत आरसा आपलें हें ब्रीद आमरण पाळीत असतो.

पुष्कळदां कटु वाटणारीं सत्यें आम्हांला तोंडावर स्पष्ट बोलून दाखवावीं लागतात. एखाद्या सुंदर ललनेला ' तूं आतां म्हातारी होत चालली आहेस.' असें तोंडावर बजावून सांगणें किती कष्टदायक असतें ? एखादा पन्नाशी उलटलेला गृहस्थ आपला चेहरा पाहूं लागतो त्यावेळीं आम्हांला म्हणावें लागतें कीं, ' बाबा, पंचवीस

वर्षांपूर्वीचा तुझा रुबाब मी पाहिला आहे. त्या वेळचा तुझा दिमाख आतां कुठें आहे ?'

एकाद्या तरुणीला तिच्या मादक व प्रभावी सौंदर्याची जाणीव आम्हीच प्रथम करून देत असतों--निर्विकल्प अज्ञानांत हें जाणीवेचें चित्र आम्हांलाच टाकावें लागतें. आम्ही जर नसतों तर स्त्रियांना आपल्या सौंदर्याच्या सामर्थ्याची कल्पना केव्हांच आली नसती.

शंभर वर्षे उलटलीं तरी पण ती आठवण माझ्या अंत:करणांतून बुजत नाहीं.

एक दिवस आमच्या घरीं एक म्हातारी संन्यासिनी दौऱ्यावर असतां आली. कुठल्याशा एका प्रसिद्ध मठाची स्वामिनी होती ती. तिच्याबरोबर एक तरुण मुलगी आली होती. अठरा वीस वर्षांपूर्वी एक अनाथ अर्भक त्या वृद्धेनें सांभाळलें होतें. तीच ही तरुणी अजूनही तशीच निष्पाप राहिली होती. मठांतील शुष्क जीवनांत संसारांतील सुख:दुखाची तिला विशेष जाणीव केव्हांही झाली नाहीं, आणि त्यामुळें निसर्गानें मुक्त हस्तानें तिला दिलेल्या सौंदर्याची तिळभरसुद्धां हानी झालेली नव्हती.

परंतु तिला आपल्या या अनुपम लावण्याचा अभिमान तर सोडाच परंतु अस्पष्ट अशी जाणीवही नव्हती. मठांत कुठले आले आहेत आरसे ! तिनें अजूनपर्यंत आपलें सौंदर्य केव्हांच न्याहाळलें नव्हतें. पाण्यांतलें प्रतिबिंब नाहीं म्हणावयास तिनें पाहिलें असेल. परंतु तिच्या असामान्य रूपसंपदेची कल्पना त्यावरून कसची येणार ?

रात्र पडली--मी होतों त्या दिवाणखान्यांत झगझगीत दिवे लावण्यांत आले. जिकडे तिकडे टापटीपीनें व्यवस्था करण्यांत आली. आणि दोन सुंदर मंचक तिथें मांडण्यांत आले.

' आज इथें कोण झोंपायला येणार ? ' मी स्वत:लाच प्रश्न केला.

नोकर माणसांनीं शय्या तयार केल्या, व दिव्याची काजळी झाडून ते जास्त प्रज्वालित करण्यांत आले. आतां खोलींत कोण प्रवेश करतें याच्याकडे माझी नजर लागून राहिली होती.

मला जास्त वेळ तिष्ठत रहावें लागलें नाहीं. दरवाजा उघडला गेला व ती वृद्ध संन्यासिनी आणि तिची ती तरुण शिष्या आंत आली. ' सोरर ' नांव होतें

त्या तरुणीचें. तिला पहातांच स्तिमित झालों मी. इतकें अप्रतिम लावण्य व उतूं जाणारें निरागस लावण्य यांचा हा मनोहर संगम खरोखरीच अद्वितीय होता.

याच महालांत एके काळीं एका नववधूस आपल्या प्रियकरासमवेत विलास करतांना मी पाहिलें होतें, आणि त्याच निर्विकारी नजरेनें आज ती म्हातारी झोंपतांना मी पहात होतों.

ती अंथरुणावर पडली व सोररनें गुडघे टेकून प्रार्थना करावयास सुरवात केली. तिची प्रार्थना संपण्यापूर्वीच म्हातारी घोरूं लागली होती.

सोररची प्रार्थना संपली आणि तिनें कपडे काढावयास सुरवात केली. एक एक कपडा तिच्या पायांपाशीं पडूं लागला आणि त्या अमंगळ काळ्या कपड्याच्या वेष्टणांतून जगाला दिपवणारी एक रम्य व सौष्ठवपूर्ण मूर्ति आपल्या निसर्गरम्यतेनें चमकूं लागली. माझी काया दगडाची असली तरी हपापलेल्या अंतःकरणानें तिचें तें विलोभनीय सौंदर्य मीं माझ्या हृदयांत सांठविलें.

विवस्त्र होतांच ती अंथरुणाकडे वळली. परंतु कोनाड्यांत तेवत असलेले दिवे विझवले गेले नव्हते. ती परतली आणि—

—वाटेंत तिला आपलें प्रतिबिंब माझ्यांत उमटलेलें दिसलें.

—ती चपापली, गोंधळली, आणि बावरलीही.

तिनें आपलें शरीर केव्हांच आरशांत पाहिलें नसल्यामुळें तिला वाटलें, आपल्याला तिथून कुणीतरी बाईमाणूस पहातें आहे. तिला आपल्या विवस्त्र कायेमुळें किंचित् संकोच वाटला. तिनें आपल्या हातांनीं आपलें विकसित वक्षस्थळ झांकून घेतलें. परंतु तिच्या प्रतिबिंबानेंही तिचेंच अनुकरण केल्यामुळें ती भानावर आली. ती दुसरी बाई म्हणजे दुसरी कोणी नसून आपलीच पडछाया आहे हें तिला कळून आलें.

मी जर सर्वांत वाईट गोष्ट कोणती केली असेल तर ती तिला तिच्या सौंदर्याची करून दिलेली जाणीव होय. दीपविसर्जन करण्याचें ती पार विसरून गेली. स्वतःचें तिला आजपर्यंत अज्ञात असलेलें सौंदर्य न्याहाळतां किती काळ लोटला हें तिलाच कळलें नाहीं. तिला स्वतःचा अभिमान वाटला. आपल्या प्रतिबिंबाचीं तिनें कितीतरी चुंबनें घेतलीं. स्वतःच्या सामर्थ्याचा कानमंत्र तिला कुणीतरी

अव्यक्त अज्ञातानें दिला.

दुसऱ्याच दिवशीं त्या आपला दौरा संपवून गेल्या, आणि मी मात्र कितीतरी दिवस तिच्या आठवणी काढीत होतों.

एक दिवस नेहमींप्रमाणेंच बाग फुलली होती. सुगंधी झुळका नेहमींसारख्याच शिवाशिवीचा खेळ खेळत होत्या. सूर्याचे किरण आपलें तांडवनृत्य नाचत होते. अशा समयीं चर्चची घंटा अचानक वाजली. कारणाची चौकशी करतां कळलें कीं मठांतून कोणीतरी पळालें होतें.

ती सोरर होती. मला आनंद झाला. असलें दिव्य लावण्य मठांतील भयाण एकांतांत कुजावें हें कुणा सहृदयास रुचेल ?

* * *

शेवटीं तो मला मोठा, त्या दोघांचा आजोबा शोभणारा आरसा आपली हकीकत सांगूं लागला. त्याच्या बोलण्यांत वरील दोघांचा आनंद वा उत्सुकता नव्हती. त्या दोघांनीं आपापलीं रहस्यें निवेदन केलीं असल्यामुळें कर्तव्य म्हणून तो बोलत होता. त्याची स्मृति ही एक शोककथा होती.

आमच्या जातीस आम्ही स्पष्टवक्ते म्हणून मोठा दिमाख आहे. परंतु आम्ही सुद्धां खोटें बोलतों. अगदीं कारण नसतांना भोळ्या भाबड्या जीवांची फसवणूक करतों. कित्येक दिवस माझ्यावरून न पुसले जाणारे ते रक्ताचे डाग—त्या रक्तलांछनाची उत्पत्ति दोन निष्पाप जीवांच्या मी केलेल्या वंचनेनेंच झाली आहे.

माझ्यावरील त्या दोन लाल डागांची शोककथा मी तुम्हाला सांगतों. ते डाग त्या निष्पाप जीवांच्या रक्ताचे डाग होते कीं पश्चात्तापानें मी ढाळलेल्या रक्ताश्रूंचे होते याचा संभ्रम मला वारंवार पडतो.

या गोष्टीला कितीतरी काळ लोटला. परंतु त्या प्रसंगाची आठवण झाली कीं तो प्रसंग कालच घडला असें वाटतें आणि त्या स्मृतीवर चार अश्रू ढाळावे असें वाटूं लागतें.

मीही तुम्हांप्रमाणें एका खानदानी घरांतच रहात होतों. त्या वाड्याचे मालक बहुधा आपल्या शहरांतल्या बंगल्यांतच रहात असत. केव्हांतरी वर्ष दोन वर्षांनीं आठवण झाली तर येत. बाकीचा सगळा काळ ते जुने कोच, जुन्या

तसबिरी, आलवणें फाटलेले व लोलक गळलेले झुंबर, आणि जुन्या हंड्या यांच्या सहवासांतच घालवला मी. माझी बैठक तुमच्याप्रमाणें दोन खिडक्यांमधें नव्हती. गच्चीसमोरील एका खिडकीच्या विरुद्ध दिशेस माझी जागा होती. वसंत ऋतूंत गच्चीच्या कठड्यावर चढविलेल्या जातिपुष्पाची सोबत वर्षांतून मला कांहीं काळ मिळे. राहिलेला काळ हरघडी रंग बदलणाऱ्या आकाशाचीं प्रतिबिंबें हृदयांत सांठवावीं, ऋतूऋतूंत बदलणाऱ्या वनराजीचें स्वरूप न्याहाळावें, आणि चांदण्या रात्रीं चंद्रप्रकाशाशीं समरस व्हावें, यांच्यापलीकडे माझ्या दैनंदिनींत फारसा फरक केव्हांच पडला नाहीं. आणि गेल्या कांहीं वर्षांत मालक वाड्याकडे केव्हांच फिरकले नसल्यामुळें माझे चालते बोलते सोबती म्हणजे कांचेच्या तावदानांतून दिसणाऱ्या चिमुकल्या चिमण्या. त्या कशा बसतात, कशा उडतात, आणि कशा बागडतात, चिवचिवतात हें पाहण्यांत मला अनिवर्चनीय आनंद होत असे.

एक दिवस अचानक आमच्या वाड्याचे मालक आले. सगळीकडे साफसुफी करण्यांत आली, सगळ्या खिडक्या उघडण्यांत आल्या, झुंबरांचीं व कोचांचीं अस्तरें आलवणें काढण्यांत आलीं, चौकटी, आरसे, तसबिरी स्वच्छ करण्यांत आल्या; स्वयंपाकघराच्या धुराड्यांतून कित्येक वर्षांनंतर धूर निघूं लागला. त्या वाड्याची जुनी अवकळा लोपून तिथें आनंद बागडूं लागला. मला सुद्धां मोकळें वाटूं लागले. वायुलहरींच्या सुखद स्पर्शास कित्येक वर्षें पारखें झालेलें माझें शरीर पुलकित झालें. आणि या आनंदांत भर घालण्याकरितांच की काय चिमण्याचें जोडपें भुर्रदिशीं उडत समोरच्या खिडकींत येऊन बसलें. इतके दिवस मी त्यांच्या क्रीडा दुरून पहात होतों. त्यावेळीं आमच्यांत तावदानाचा अंतराय होता. इतक्या जवळून मी त्यांना क्वचितच पाहिलें होतें. माझा आनंद खरोखरच द्विगुणित झाला. परंतु कुठें खुट्ट झालें कुणाला ठाऊक, त्या भुर्रदिशीं पुन्हां उडाल्या आणि क्षणार्धांत गतप्राण होऊन माझ्या पायाशीं पडल्या.

काय घडलें तें माझें मलाच कळलें नाहीं. परंतु लवकरच मला कळून आलें. माझ्यांत प्रतिबिंबित झालेलें सुंदर आकाश पाहून त्यांची फसवणूक झाली होती. त्यांना वाटलें मी म्हणजे एक खिडकी आहें. पण या मयसभेच्या मायेची या बिचाऱ्यांना काय कल्पना !

त्या चिमण्याच्या चोंची जिथें जोरानें आपटल्या—तेच ते रक्ताचे डाग!

संपली माझी गोष्ट! माझें हृदय सत्यनिदर्शक आहे असा जो मला पोकळ अभिमान होता, तोसुद्धां माझी स्वतःची फसवणूक होती.

* * *

त्या करुण कथेच्या श्रवणानेंच कीं काय सर्वत्र निस्तब्ध शांतता पसरली.

अनुवाद—**जयवंतराव ज. सरदेसाई**

# देवदूताची समाधि

असाच एक दिवस सकाळीं मी आरामखुर्चीवर आराम करीत पडलों होतों. नुकत्याच वाचून संपविलेल्या एका ग्रीक सुखान्तिकेंतील पात्रें अजून नजरेसमोर तरळत होतीं. जगांत शांतता व समृद्धि नांदावी म्हणून आपल्या सुवर्णवाहनांतून स्वारीवर निघालेला वृद्ध 'त्रिझेव' अजूनही मला दिसत होता. इतक्यांत तिसऱ्यानदां माझ्या टेलिफोनची घंटा खणाणली. माझ्या लंगोटियार दोस्ताकडून आला होता तो फोन. पावलु नोब्रेग त्याचें नांव. कुठल्याशा खात्यांत इंजीनियर होता तो.

आज त्याचा आवाज नेहमींसारखा विषण्ण नाहीं वाटला मला. आज त्याच्या आवाजांत किंचित् आनंदाची झाक मारत होती.

" उद्यां आमच्याकडे जेवायला आलं पाहिजे तुला." तो बोलत होता.

" पण उद्यां मला जमणार नाहीं. " मी उत्तर दिलें.

" ते कांहीं नाहीं, उद्यां आलंच पाहिजे. तुझ्याशीं माझं महत्वाचं काम आहे."

" बरं. किती वाजतां येऊं ?"

" एक वाजतां जेवण होईल—परंतु बारा वाजण्यापूर्वी तूं आलं पाहिजे."

" कां ? "

" तें मग कळेल. "

" बरं तर. घेऊं तुझा निरोप ? "

" हो. उद्यां वाट पाहीन. "

टेलिफोन बंद करून मी पुन्हां आरामखुर्चीवर पडलों. मानवी मन किती चमत्कारिक असतें पहा. नुकत्याच अनुभवेलल्या कलाकृतीचा आनंद अदृश्य होऊन विषण्णतेनें त्याचें स्थान घेतलें. पावलु नोब्रेगसारख्या सर्वगुणसंपन्न माणसास ईश्वरानें नेहमीं

आनंदांत ठेवण्यास हवा होता. परंतु सुखाचा लेशही न मिळण्याची कारवाई त्याच्या निष्ठुर दैवानें केली होती. माणसाचें आयुष्य जेवढें सरळ असेल तितकें तें ज्यास्त सुखी असतें. परंतु नोब्रेगच्या आयुष्याचा गुंताडा होऊन गेला होता. संसारांतलें सुख म्हणजे एक देवघेवीचा व्यवहार असतो. परंतु नोब्रेगची आई ही एक इंग्लीश बाई असल्यामुळें सोशिकपणाचा अंशसुद्धां त्याच्यांत उतरला नाहीं. उलट फाजील भावना-प्रधान स्वभावामुळें स्वत:च्या हातांनीं तो दु:खद प्रसंग निर्माण करीत असे.

—नाहींतर त्याची पहिली प्रियकरीण नीना—तिला आत्महत्या कां करावी लागली असती ? आणि त्याच्यानंतर त्याची प्रीतिदेवता झालेली एस्तेर—एका ज्यू शिंप्याची पोर—तिला त्याचें पत्नीपद कसें लाभलें असतें ?

गरीब बिचारी एस्तेर—तिला मात्र या विवाहामुळें सुख लाभलें नाहीं. अशा परिस्थितींत तिनें सहा वर्षें कशीबशीं काढली, आणि शेवटीं कंटाळून तिला घटस्फोट मागावा लागला.

सुस्वभावानें एकापेक्षां एक सरस असलेलीं हीं पपितत्नी—परंतु संसार मात्र सुखाचा झाला नाहीं. संसारांतील सुख हें माणसाच्या स्वाधीन असतें. फक्त तें मिळविण्याचा प्रयत्न मात्र माणसानें केला पाहिजे. परंतु त्याला लागणारी सोशीक वृत्ति नोब्रेगकडे मुळींच नव्हती—मग सुखाची निर्मिति व्हावी कशी ?

* * *

कांहीं वर्षांपूर्वीं आनंदाचें नंदनवन असणारें त्याचें घर ! आतां स्मशान-शांतता तिथें नांदत होती. जेव्हां जेव्हां मी त्याच्या भेटीला जाई त्या त्या वेळीं रिकाम्या खुर्च्यांमधल्या आपल्या आरामखुर्चीत तो भकास व विषण्ण चेहऱ्यानें निपचित पडलेला मला आढळे. त्याचें सांत्वन करण्यास माझ्याजवळ शब्द नव्हते. घटकाभर बसून प्राप्त दु:स्थितीचा त्याला विसर पाडणें कुणाही गोष्टीवेल्हाळाला शक्य नव्हतें. आणि त्याच्या सान्निध्यांत वेळ सरतां सरत नसे. त्यामुळें तिथें जाणें म्हणजे एक मोठा स्वार्थत्याग करण्यासारखें होतें.

सुखानें शिगोशिग भरलेला एक संसार भंगलेला पाहणें किती कष्टदायक असतें ! आणि हें दु:ख ज्या मानानें त्या संसाराच्या मालकाशीं आपलें जिव्हाळ्याचें नातें असेल, त्या मानानें जास्त जाणवतें.

पावलु नोब्रेग, त्याची आतां बंधमुक्त झालेली पत्नी एस्तेर, प्रत्येकाशीं माझा अकृत्रिम स्नेह होता, आणि त्यामुळें मी तिथें गेलों म्हणजे तेथील प्रत्येक वस्तू आपल्या धन्याचें गतसौख्य मला सांगत असे.

एस्तेर वाजवीत असलेला पियानो तीच शोककथा दीनवाणीनें आळवीत असे, आणि त्याबरोबर तिच्या आवडीच्या गाण्याचे स्वर अजून वातावरणांतून नाहींसे झाले नाहींत असा भास होई. तिची नेहमीं बसण्याची आवडती खुर्ची म्हणजे, तींत ती नेहमींप्रमाणें ऐटीत बसली असून नर्मविनोदी भाषण करते आहे असें वाटे, आणि थंडीच्या दिवसांत पेटली जाणारी संगमरवरी शेकोटीही तीच करुण कहाणी सांगत असे.

एवंच त्या सुखी युग्माच्या संगतींत घालविलेले कित्येक दिवस आज फक्त स्मृतिशेष ठरले होते.

स्त्रीच्या शरिरांतलें स्त्रीत्व जोंपर्यंत जिवंत असतें तोंपर्यंत तिथें आनंद व सौख्य नांदत असतें. परंतु तें नष्ट झालें म्हणजे त्याबरोबर सगळें नाश पावतें, असें एक शास्त्रज्ञ म्हणतो ते कांहीं खोटें नाहीं.

एस्तेर—तिची नाजूक व कृश मूर्ति माझ्या नजरेसमोर उभी राहिली. तिचा घटस्फोट मंजूर झाल्यानंतर कितीतरी दिवस मी तिला पाहिली नव्हती. विकसित पुष्पाप्रमाणें नेहमीं प्रसन्न असणारा तिचा चेहरा घटस्फोटाच्या प्रसंगीं जसा कोमेजला होता तसाच अजूनपर्यंत राहिला असेल का? कोमेजलेलें पुष्प पुन्हा विसकेल का?

एक दिवस बागेंत फिरतां फिरतां ती बोललेल्या शब्दपंक्ती पुन्हां माझ्या कानावर आदळल्याचा भास झाला.

ती निश्चयी स्वरानें म्हणाली होती,

"आतांच्या त्याच्या वागणुकीवरून याच्यापुढं मी माझ्या नवऱ्यावर प्रेम करूं शकेन असं मला वाटत नाहीं."

आणि त्यावेळीं मी तिला म्हटलें होतें,

"एस्तेर, असं पहा, पति आणि पत्नी यांनीं परस्परांवर प्रेम करणं हें तर योग्यच, नव्हे आवश्यक आहे. परंतु त्याहीपेक्षां त्यांनी एकमेकांना पुरतं ओळखणं हें त्याच्याहीपेक्षां जास्त महत्त्वाचं आहे."

आणि खरोखरच तीं एकमेकांना पुरीं ओळखत नव्हतीं–नोब्रेगला आपल्या आनुवंशिकतेमुळें दुसऱ्याशीं समरस होणें केव्हांच जमत नसे. आणि एस्तेर–तिलाही ही कला अवगत नव्हती. निव्वळ फसवाफसवीचा प्रकार चालू होता, हें मी मात्र पुरतेपणीं समजून चुकलों होतों. आणि कलहाच्या प्रसंगीं त्यांची समजूत घालण्याचा निष्फळ प्रयत्न वारंवार करीत होतों.

पतिपत्नींतलें हें वितुष्ट दिवसेंदिवस इतकें वाढत गेलें कीं एक दिवस त्याचा कळस झाला––एकमेकांना अपशब्द बोलण्यापर्यंत दोघांची मजल गेली. दोघांतही समजूतदारपणाचा अंश कमी होता.

त्यांची समजूत करण्याचा मी बराच प्रयत्न केला. असल्या क्षुल्लक कारणास्तव विवाहसंस्थेचें मंदिर असें उध्वस्त करणें योग्य नव्हे, इत्यादि उपदेश करावयास मी चुकलों नाहीं.

परंतु या गोष्टीचा शेवट मात्र ठरलेला झाला. एस्तेर घरांतून निघून गेली, आणि नोब्रेगनें चिडून घटस्फोट मागितला व आपल्या एकुलत्या एक पांच वर्षांच्या मुलीची व आपली ताटातूट होऊं नये म्हणून तिला घेऊन तो प्रवासास निघाला, आणि लंडनच्या एका श्रीमंत वसतीगृहांत त्यानें तिला शिक्षणाकरितां ठेवून दिलें.

परंतु दुर्दैवानें हें अपत्यसौख्यही नोब्रेगला जास्त काळ लाभूं दिलें नाहीं. ती निष्पाप व निरागस पोर आईबापांची आठवण विसरते न विसरते तोंच एका सांथीला बळी पडली, आणि नोब्रेगची वृत्ति जरा स्थिर होते न होते तोंच लंडनहून ही तांतडीची तार आली. तेथून येतांना आपल्या प्रिय कन्येचें शव घेऊन येणें त्याच्या नशिबीं आलें. केवळ तिला मारून टाकण्याकरतांच आपण इतक्या दूर नेऊन ठेवली अशी जाचणी त्याच्या जिवाला जाळूं लागली.

* * *

भरधांव जाणाऱ्या आगगाडींतून मी त्याच्याकडे जात होतों, सभोंवारची सृष्टि त्याच वेगानें दृष्टीआड होत होती, आणि माझ्या मनांत उभें राहिलेलें विश्व त्याहीपेक्षां विलक्षण वेगानें फिरत होतें. नोब्रेगच्या आयुष्याचा चित्रपट माझ्या मनःचक्षूंसमोर धांवत होता.

अपेक्षित स्टेशन आलें, मीं घाईघाईनें उतरलों, प्रथम दिसलेल्या मोटारींत

शिरलों व शॉफरला नोब्रेगच्या घराचा पत्ता सांगितला.

माझ्या सूचनेप्रमाणें मोटार भरवेगांत धांवत होती. रस्ता सावलींतून जात असल्यामुळें कसें अगदीं गार गार वाटत होतें. दोन्ही बाजूंस असलेलीं सुरूचीं उंच झाडें जोर्डानें मागें पळत होतीं. उजव्या बाजूस पसरलेल्या नदीच्या विस्तीर्ण पात्रावर सूर्यकिरणांचा नाच रंगांत आला होता. आणि तो पहाण्याकरतांच कीं काय किनाऱ्यावरील झाडें पाण्यावर वांकलीं होतीं.

बागेच्या भव्य प्रवेशद्वारांत आमची मोटार थांबली. बाजूस आणखी मोटारी उभ्या होत्या, आणि त्यांपैकीं एक फुलांनीं शृंगारलेली होती.

मीं उतरण्यापूर्वींच नोब्रेगचा म्हातारा व इमानी सेवक जवळ धांवतच आला आणि त्यानें मोटारचें दार मोठ्या अदबीनें उघडलें. ऐंशीं वर्षांच्या त्या म्हाताऱ्याचे डोळे आनंदानें लुकलुकत होते. इतक्या आनंदांत त्याला मी केव्हांही पाहिला नव्हता. बागेंतून बंगल्याकडे जातांना एक सुंदर मयूर पक्ष्यांचे जोडपें न्हरांड्याच्या कठड्यावर अनुनय करीत बसलें होतें, तें माझ्या नजरेंतून सुटलें नाहीं.

जिकडे तिकडे प्रसन्न वातावरण पसरलें होतें--त्याचा परिणाम माझ्याहि मनावर झाल्याशिवाय राहिला नाहीं.

दिवाणखान्याच्या दरवाजांतच नोब्रेग समारंभाच्या मंगल पोषाखांत हजर होता. मला पहातांच एकाद्या लहान मुलाप्रमाणें त्यानें मला मिठी मारली. त्याच्याही चेहऱ्यावर आनंद व समाधान विलसत होतें. मला मात्र या आनंदाचें कारण उलगडत नव्हतें.

" अगदीं वेळेवर आलों ना ? " कांहीतरी बोलावें म्हणून मी बोललों.

" किती उत्कंठेनं मीं तुझी वाट पहात होतों, तुला कल्पना नाहीं. "

" परंतु अजून तरी मला कुठं कल्पना आहे !" मी म्हटलें.

नोब्रेग कांहींच बोलला नाहीं. नुसतें स्मित केलें त्यानें. व मला घेऊन त्यानें दिवाणखान्यांत प्रवेश केला.

तेथें कोणीतरी दोन अनोळखी गृहस्थ बसले होते व तेहि समारंभाच्या पोषाखांत होते. मीं कांहींतरी विचारणार, इतक्यांत चर्चेची बारा वाजतां वाजणारी घंटा वाजली, आणि त्याबरोबर नोब्रेगनें माझा हात सोडला, नजर खालीं वळवली

च तो पुटपुटला,

" माझं आज लग्न— "

" लग्न ? आणि तें केव्हां ठरलं ? " मी जवळ जवळ ओरडलोंच.

माझ्या मुख्य प्रश्नास बगल देऊन तो म्हणाला,

" माझ्या लग्नाचा एक साक्षीदार तूं आहेस आणि दुसरा हे गृहस्थ—हे माझे सॉलीसिटर आहेत. "

माझा विस्मय पळापळानें वाढत होता. त्या म्हाताऱ्या सॉलीसिटरशीं शिष्टाचार म्हणून तरी हस्तांदोलन करण्याचें मीं पार विसरून गेलों. इतकेंच नव्हे तर त्याच्या साफ टक्कल पडलेल्या व कुठेंकुठें गवताच्या काडीप्रमाणें ताठ उभे असणाऱ्या शुभ्र केंसाकडेही माझें लक्ष गेलें नाहीं.

नोब्रेग काय बोलतो आहे तेंच मला समजत नव्हतें. एकुलती एक कन्या वारल्यास अजून एक वर्षही लोटलें नव्हतें. आणि घटस्फोटास तर कांहीं महिनेच झाले होते. परंतु नोब्रेगसारख्या अस्थिर माणसांच्या बाबतींत मात्र हें सगळें शक्य होतें याचीही जाणीव मला होतीच. एरव्हीं त्याचें वय पन्नाशीच्या घरांत होतें व केंसही अर्धे अधिक पांढरे झाले होते. अशा स्थितींत हा गृहस्थ पुन्हां लग्नाच्या फंदांत पडतो हें पाहून मला नवल वाटल्यास आश्चर्य नव्हतें.

तरीपण मी विचारलेंच.

" पण नवरी तरी कुठून पैदा केलीस ? "

त्यानें न बोलतांच मला खूण केली. त्याला कुणाची तरी चाहूल लागली असावी.

इतक्यांत दिवाणखान्याचा किनखापी पडदा बाजूला सरकला गेला व एक उंच, कृश पण सुंदर बाई प्रवेश करती झाली. तिच्या हातांत सोनेरी पुठ्ठयाचें मूल्यवान् बायबल होतें.

ती स्त्री दुसरी तिसरी कोणी नसून नोब्रेगची पूर्वपत्नी एस्तेरच होती.

"पाहिलीस ही माझी वधू ? इच्याबरोबरच मी पुनर्विवाह करणार आहें." नोब्रेग गंभीर मुद्रेनें म्हणाला.

माझ्या आश्चर्याचा तर कळसच झाला. मी स्वप्नसृष्टींत तर नाहीं असा क्षणभर भास झाला मला. आणि नोब्रेगच्या आयुष्याचा चित्रपट आणखी एकदां

माझ्या नजरेसमोरून सरकला.

त्यानें आणखी एक भानगड उपस्थित केली यांत संशय नव्हता. त्याच्या संसाराची पुनर्घटना होणें ही मला अशक्य कोटींतील गोष्ट वाटत होती. पति-पत्नीच्या भावनांच्या आणि हेवादाव्याच्या रणधुमाळींत गरीब बिचारी मुलगी मात्र चिरडून नामशेष झाली.

घटस्फोटानंतर एस्तेर आजच नोंग्रेगच्या वाड्यांत आली होती. मी तिच्या हाताचें चुंबन घेतलें--माझी गरीब मैत्रीण एकही शब्द बोलली नाहीं. परंतु भावना-वेगानें तिचा कांपणारा हात व डोळ्यांच्या कडेंतून झिरपणारे अश्रुबिंदु मला तिचें भारावलेलें अंतःकरण बोलून दाखवीत होते—परंतु त्यांतलें आनंद–विषादाचें प्रमाण मात्र तिला सुद्धां सांगतां आलें नसतें. समाधान, आनंद, विषाद त्या वातावरणांत तरंगत होता.

" माझ्याकडून सगळी तयारी आहे. " विवाह रजिस्टर करणारा तो दुसरा टक्कल पडलेला म्हातारा कारकून पुटपुटला.

कायदेशीर लग्नविधि थोडक्यांत आटपला. एस्तेरची म्हातारी आईही या समारंभास हजर होती. त्या बेसुमार लठ्ठ व सुरकुतलेल्या कातडीच्या म्हाताऱ्या बाईच्या नजरेंत समाधान दिसत होतें–परंतु त्याच्या आडून एक मिस्किल भाव तरळत होता. जणुं ती विचारीत होती,

' जर तुम्हाला पुनर्विवाह करावयाचा होता तर घटस्फोट आणखी कां घेतलात ? '

* * *

जेवणाचें टेबल उंची खाद्यपेयांनी सजविलेलें होतें व भोजनाचें दालन उत्तम तऱ्हेनें शृंगारलेलें होतें. पण मला त्यांत विशेष नावीन्य वाटलें नाहीं. कारण त्याच दालनांत मी त्या उभयतांचा कित्येकदां पंक्तिलाभ घेतला होता.

भरपूर सुग्रास भोजनानंतर जेव्हां कॉफी आली तेव्हां माझा मित्र म्हणाला,

" आपण पलिकडच्या दिवाणखान्यांत बसून घेऊं, चल."

इतर मंडळींना तेथेंच सोडून आम्ही पलीकडच्या दालनांत गेलों. एका शेकोटीशीं बसून आम्ही सिगारेट फुंकीत होतों. मधूनमधून आमचें कॉफीपान

चालू होतें.

नोब्रेगनें हळुहळू आपली हकिकत सांगायला प्रारंभ केला. एक वर्षाच्या त्याच्या आयुष्याचा इतिहास होता तो. एस्तेरेची व त्याची भेट पुन्हां कशी झाली व पुनर्मीलनाचा हा सुयोग कसा घडून आला त्याची कहाणी होती ती. त्याच्याच शब्दांत ती देतों.

"लंडनहून त्या अभागी अर्भकाचें शव घेऊन मीं घरीं येण्यास निघालों. तिकडून निघतांना एस्तेरला तशी तार मी दिली. त्या भयंकर वार्तेनें ती मूर्च्छित झाली व मेंदूवर आघात होऊन ती आजारी पडली व जवळजवळ एक महिनापर्यंत ती मरणाच्या दारींच पडलेली होती.

"आणि ती अशाच अवस्थेंत असतांना शवाला मूठमाती देणें मला भाग पडलें. प्रिय मुलीचें शवसुद्धां डोळे भरून पहाण्याचें भाग्य तिला लाभलें नाहीं.

"मी स्मशानांत जाऊन माझ्या निष्पाप मुलीच्या थडग्याचें दर्शन दररोज घेत असें. माझा हा क्रम कित्येक दिवस अखंडित चालला होता. एक दिवस मला तिच्या आईची अचानक तार आली. त्यांत लिहिलें होतें—

" 'एस्तेर लिस्बनला येण्यास निघाली आहे.'

"मला आश्चर्य वाटलें नाहीं. मृतकन्येच्या शवावर नाहीं तरी निदान थडग्या-वर तरी चार अश्रू ढाळावे व फुलें वहावीं असें कुणा सहृदय मातेस वाटणार नाहीं?

"आणि त्याकरतांच तिच्या भावनांना मान देण्याचें मी ठरविलें. स्मशानांत आमची गांठ पडूं नये म्हणून मी तिथं जाण्याचं बंद केलं, आणि शक्य तों वाच-नांत वेळ घालवायचा निश्चय केला. परंतु एस्तेरची मूर्ति हट्टीपणानें माझ्या मन-श्चक्षूंसमोर नाचत होती. थडग्याच्या दोन्ही बाजूंस आम्ही गुडघे टेकून बसलों असून आमच्या अश्रूंचा अभिषेक त्या थडग्यावर चालला आहे, व झालें गेलें तें गंगेला मिळालें, आपण पुन्हां एकत्र होऊंया, असें आमचे डोळे बोलत आहेत असा मला क्षणोक्षणीं भास होई.

"हा भास, हे विचार मी जसजसे दूर करण्याचा प्रयत्न करीत होतों तसतशी कुणीतरी अज्ञात शक्ति मला त्या मोहपाशांत जास्त जास्त आंवळीत होती. निग्रहानें तोडलेले पाश कुणी तरी पुन्हा निर्मीत होतें.

"विवेक, बुद्धि, माझ्या शरिरांतील बुद्धीचा प्रत्येक कण, मला त्या दिवशीं स्मशानांत जाऊं नको म्हणून सारखा मार्गे खेंचीत होता, पण तितक्याच जोरांत माझें मन मला तिथं जाण्याविषयीं विनवीत होतं.

"आणि दुसऱ्याचाच या रस्सीखेचींत विजय झाला.

"नकळत मी उंची कपडे पेहरले व ती स्मशानांत भेटणार नाहीं अशी मनाची समजूत घालून मी स्मशानाचा मार्ग धरला.

"स्मशानाच्या कमानींतच एक भाड्याची मोटार उभी होती. एस्तेरच तर नसेलना ? शॉफरकडे चौकशी करतां त्यानें एक उंच कृश पण सुंदर बाई आपल्या मोटरींतून आल्याचें सांगितलें.

"तरी पण धीर करून मी आंत प्रवेश केला. त्या थडग्यावर कुणीतरी काळें वस्त्र नेसलेली व्यक्ती अस्ताव्यस्त पडलेली मला दिसली. मी जवळ जवळ धांवतच गेलों. परंतु त्या व्यक्तीनें कांहींच हालचाल केली नाहीं. मी हांका मारल्या, पण ती व्यक्ती तसूभरही हालली नाहीं. शेवटीं मी तिला उचलली.

"ती एस्तेरच होती यांत संशय नव्हता. पण किती कृश व खंगलेली दिसली मला.

"तिला शुद्धीवर आणण्यास मला बरेच प्रयत्न करावे लागले. आणि ती जरा सावध होतांच शॉफरच्या मदतीनें मी तिला मोटारींत आणून बसविलें. तिला निदान घरीं तरी पोंचविणें माझें कर्तव्यच होतें. मोटारींत माझ्या छातीवर मान टेकून ती निःसहाय्यतेनें रडत होती.

"दुसऱ्या दिवशीं आमची पुनः स्मशानांतच गांठ पडली आणि त्यानंतर आमच्या वारंवार तिथं गांठी पडूं लागल्या. जणुं तें एक भेटायचें संकेतस्थळच झालें. तरी पण मी अजून तिच्याजवळ बोललों नव्हतों. ती रडूं लागली म्हणजे मला रडूं येई. तिच्या प्रत्येक मूक प्रश्नाला माझ्याकडून तसलेंच मूक उत्तर दिलें जाई. आमची मुलगी जें कार्य जिवंत असतां करूं शकली नाहीं तें मेल्यानंतर जणूं करीत होती.

"आणि अशा परिस्थितींत कितीतरी दिवस निघून गेले. आमचा कार्यक्रम अखंडित चालू होता. प्रत्येक दिवसाच्या अश्रुपातानें आमचें हृदय धुवून निघत

होतें आणि शेवटीं आमचीं हृदयें ज्या दिवशीं पूर्ण निष्कलंक झालीं त्याच दिवशीं आम्ही एकमेकांजवळ बोललों. घटस्फोटाची अयथार्तता त्या दिवशींच काय ती आम्हाला पटली. आणि त्याच दिवशीं आमची ती चूक दुरुस्त करण्याचा शहाणपणा आम्ही केला. परंतु एवढं शहाणपण शिकण्याला आमच्या निरागस बालकाचा बळी घ्यावा लागला ही जाणीव मात्र अजून जीव जाळीत आहे. कायद्यानें मीं पूर्वपत्नी मिळवूं शकलों पण माझ्या मुलीच्या बाबतींत मानवी उपाय काय करणार ? कुणाला ठाऊक, पतिपत्नीच्या हेव्यादाव्यांत किती निष्पाप अर्भकें स्वर्गाची वाट चालत असतील !

"आणि म्हणूनच मी म्हणतों एखाद्या विविक्षित परिस्थितींत घटस्फोट युक्त असेल, तरी पण मुलें असलीं तर तो होऊं देतां कामा नये."

बाहेर पक्षी गात होते, मयूर पक्षांच्या जोडप्याचा अनुनय रंगांत आला होता, आणि त्या दिवशीं पडलेला स्वच्छ सूर्यप्रकाश कित्येक महिने तिकडे पडलेला नव्हता. जणूं निसर्गच त्यांच्या पुनर्मीलनाला आवाहन व आशीर्वाद देत होता.

इतक्यांत बाहेर निघण्याच्या तयारींत एस्तेरच तेथें आली. तिच्या नाजूक हातांत टवटवीत गुलाबपुष्पांचा एक सुंदर गुच्छ होता.

"निघायचा वेळ झाला..." ती हलक्या आवाजांत पुटपुटली.

"पण कुठं ?" मी प्रश्न केला.

एस्तेरनें नजर खालीं वळवली. तिच्या टपोऱ्या डोळ्यांच्या तेजांत आंत जमलेले अश्रु भर घालीत होते.

अपरिमित खिन्नतेनें स्मित करीत ती म्हणाली,

" स्मशानांत ! त्या देवदूताच्या समाधीचें दर्शन घ्यावयाला. "

लेखक—ज्यूलियु दांतग्

अनुवादक—जयवंतराव सरदेसाई

# जिवंत मरण

माझ्या प्रिय मित्रा,

अगदीं विचित्र मन:स्थितींत, सुन्न अंत:करणानं मी हें पत्र तुला लिहीत आहें. माझा पती अत्यंत आजारी आहे. त्याला झालेल्या रोगाच्या निदानाबद्दल आतां कोणताच संदेह उरलेला नाहीं. आमची भयंकर खात्री झाली आहे त्या बाबतींत! क्षयरोगाचे जंतू त्याच्या देहांत वास करीत आहेत.

डॉक्टरनीं आपसांत चिकित्सा करून एकमतानं लिहून दिलेलं रोगाचं निदान या क्षणीं माझ्या हातांत आहे. पण माझ्या पतीला यांतलं कांहींच ठाऊक नाहीं. आज डॉक्टर पुन्हां येणार नी 'क्ष' किरणांनीं त्याची तपासणी करणार.

किती विचित्र आमचं जीवित अन् किती विचित्र त्याचा शेवट! गेल्या एकदोन महिन्यांपूर्वी तूं सुद्धां मला म्हणत होतास कीं, या जगांतील मी एक सुखी स्त्री आहें, नाहीं का? एकाद्या बालकासारख्या माझ्या खेळकर नी निर्व्याज काळ्या डोळ्यांकडे पाहून तूं कौतुकानं हंसत होतास आणि कधींकाळीं आपल्याला मुलगी झाली, तर तिच्या ठिकाणीं अशा तऱ्हेची आनंदी वृत्ती असावी अशी इच्छा करण्याइतका तुला माझ्या अल्लड स्वभावाचा हेवा वाटे; होय ना? पण...हाय! तें सारं कसं बदलून गेलं एका घटकेंत! नी माझं जीवन आतां असं तापदायक, भीषण अन् काळंकुट्ट झालं आहे.

हें पत्र लिहिण्यास घेण्यापूर्वी मी कितीतरी वेळ बुचकळ्यांत पडलें. तुझ्यावांचून माझा पूर्ण विश्वास असा कुणावरही नाहीं. तथापि तुझ्याशींसुद्धां माझं अंत:करण उघडं करण्यास मला संकोच वाटतो. नी लज्जेनं जीव कावराबावरा होतो.

प्रिय मित्रा, माझ्या मानसिक असह्य व्यथा तुला कळल्या असल्या...... तर...? मनाची दुर्बलता, भयंकर स्वार्थीपणा यांच्या मुशींतून ओतली गेलेली मी

—जी रडते, त्रास पावते व स्वत:विरुद्ध बंड करूं पहाते—तिला अद्याप माहित नाहीं कीं, मागंपुढं स्वत:चा आपल्याला भयंकर तिटकारा वाटेल कीं स्वत:बद्दल अत्यंत करुणा येईल.

माझ्या भीषण भवितव्यतेचा विचार एकसारखा माझ्या डोक्यांत थैमान मांडीत असतो. रात्रीच्या रात्री माझे डोळे सताड उघडे असतात. माझी प्रकृती पण बरी नाहीं. मी अशक्त झालें आहें. माझ्या बोटांतील आंगठ्या गळून पडतात. प्रिय मित्रा, माझ्याकडे जरा जिव्हाळ्यानं पहा आणि मला यावेळीं तुझा योग्य सल्ला देऊन तसदीबद्दल मला क्षमा कर.

माझ्या अंत:करणांत कसलं भयंकर द्वंद्वयुद्ध, कसला भयंकर झगडा चालला आहे तें बहुतकरून तूं तर्कानं ताडलं असशील ! पण असं जरी असलं, तरी सगळं कांहीं उघडपणें व मोकळ्या मनानं तुला कथन करणं जरूर आहे.

माझा पती स्वर्गाचे सोपान चढावयास लागला आहे. डॉक्टर माझ्यापासून कांहींच गुप्त ठेवीत नाहींत. क्षयासारख्या अजिंक्य शत्रूपासून माझ्या पतीचं रक्षण करणं कुणालाच शक्य नाहीं आतां ! त्याचा मृत्यु ठरलेला आहे–पण त्याच्याशीं तो कांहीं काळ झुंज खेळणार हें निश्चित. आठ महिने असो, दहा महिने असो किंवा वर्ष असो, पण...तो जगणार...कळलं ना तुला मी काय म्हणतें तें ? आपल्या सभोंवतीं मृत्यूचीं बीजं पेरीत अत्यंत चिवटपणें तो जगणार; आणि मी ?......आणि मी ? ? !......आत्महत्त्या करणं हेंच माझं कर्तव्य, हाच माझा अधिकार ठरणार काय ? एकाच मेजावर, एकाच अंथरुणावर, माझ्या पतीच्या शिसारी आणणाऱ्या श्वासाशीं श्वास भिडवून त्याचीं विषारी चुंबनं घेऊन मी रहाणार काय ?

अर्थात नाहीं ! तेवढी शक्ति मला नाहीं. तेवढं धाडसही पण मला नाहीं.

माझं वय तेवीस वर्षाचं आहे. माझे डोळे तारुण्याच्या उन्मादानं चकाकत आहेत. माझ्या गात्रागात्रांतून यौवन सळसळत आहे. नी गरम रक्तानं भरलेल्या माझ्या नसा धडधडत आहेत. ......मी जगणार......आणि मला जगलं पाहिजे. मी जगणार आहें !

माझ्या मित्रा, तूं माझा कर्णधार हो. आणि मला योग्य ती बुद्धी दे. माझी दया तुला येऊं दे.

माझ्या आईचं काळीज अगदीं दुबळं होतं. सुंदर केशकलापाबरोबर अशक्त हृदय तिच्याकडून मला मिळालेलं आहे.

आणखी एक महिना, फार काय एक दिवस पतीच्या सहवासांत मी रहाणं म्हणजे मृत्यूच्या कराल दाढेंत उडी घालण्यासारखं आहे...आणि कां पण तें ? असं मी वाईट काय केलं आहे ? नी माझ्या बलिदानाचा उपयोग पण काय आहे ?

तो बरा होणं संभवनीय असतं तर माझ्या रहाण्यांत, दर दिवशीं, दर तासाला, दर क्षणाला भयंकर मानसिक यातना सोशीत राहून शेवटीं माझी आहुति देण्यांत अर्थ तरी होता.

दोनचार दिवसांपूर्वी मध्यरात्रीच्या सुमारास माझ्या पतीला अकस्मात रक्ताची गुळणी आली. आणि जवळचा टॉवेल रक्तानं भरून गेला. त्यावेळीं त्यानं मला आपल्याजवळ, आपल्या कॉटवर बसवून घेतलं. हेतू हा कीं, मी त्याच्याशीं बोलत रहावं, त्याच्या अंगावरून हात फिरवावा नी त्याचीं चुंबनं घ्यावीं.

आणि सर्वसामान्य, निर्दय, स्वार्थी रुग्णाइताप्रमाणं त्यानं आपल्या सर्व इच्छा मजकडून पुरवून घेतल्या.

त्या प्रसंगानंतर माझं मन पुरं बंडखोर बनलं. तेथून-त्याच्या संसर्गापासून कुठं तरी दूर निघून जावं असं मला उत्कटतेनं वाटलं.

त्याप्रमाणें लगेच दुसऱ्या दिवशीं पहांटेच्या समयीं झटकन् मी कपडे केले. कांहीं पैसा अडका व दागिने हातांत धरण्याच्या लहानशा बॅगेंत कोंबले आणि माहेरीं जाण्यास मी निघालें.

पण मी बाहेरच्या दरवाजाजवळ पोंचलें असेन नसेन, इतक्यांत आंतील खोलींतून भेदक व तीक्ष्ण स्वरांत शब्द निघाले:—

"कुठं चालर्लीस ज्युलियेत ?"

अकस्मात् विजेचा धक्का बसल्याप्रमाणं मी तिथल्या तिथंच पांढरी फटफटीत झालें. हृदय जोरानं धडधडूं लागलं. गुदमरलेल्या आवाजांत मी कसंबसं म्हटलं,

"चर्चमध्यें...प्रार्थनेला !"

आणि त्याक्षणीं माझ्या पळण्यांत, माझ्या वर्तनांत मला अमानुषपणा दिसला. माझ्या कृत्याचा अघोरीपणा मला जाणवला. स्त्रिजातीची निसर्गसिद्ध कोमल

वृत्ती नी माझ्या अंत:करणाची नैतिक संस्कृति जाग्या होऊन मला बजावून सांगूं लागल्या कीं, माझं स्थान इथंच—पतीच्या रुग्णशय्येजवळ आहे. व एखाद्या परिचारिकेप्रमाणं, आईप्रमाणं नी बहिणीप्रमाणं त्याची सेवासुश्रुषा करीत मी राहिलं पाहिजे.

दयेची जागरूक वृत्ति माझ्या अंगांत निर्माण झाली व मी राहिलें.

दुसऱ्या दिवशीं रात्रीचे बारा वाजल्यानंतर झोंपण्यास जातांना मी त्याचा निरोप घेऊं लागलें. त्यावेळीं संधी साधून त्यानें मला घट्ट मिठी मारली. मी गडबडून गेलें. तापानं त्याच सर्वांग भाजत होतं, त्याच्या तीक्ष्ण जळजळीत नजरेंतून अग्नीचे कण उडत होते. नी त्याच्या मस्तकांतून घाम निथळत होता.

त्याची मिठी मला असह्य झाली. त्याच्या बाहुपाशांतून सुटण्यासाठीं मी धडपड केली. पण त्यानं मला अधिकच आवळून धरलं. मला क्षणभर कांहीं सुचेना. भयविव्हल स्वरांत मी ओरडलें.

माझ्या ओरडण्यानं नोकर लोक तिथं धावून आले. मी कशीबशी सुटका करून घेतली. माझं तोंड, माझा झगा, माझे केस रक्तानं माखून निघाले होते.

नाहीं...माझ्या मित्रा, आतां नाहीं रे मला हें सहन होत ! माझ्या देहांतील सर्व शक्ती एकवटून मला निक्षून सांगत आहे कीं, यापुढें अशा स्थितींत खितपत पडण्यास आपण तयार नाहीं.

माझ्या पतीला आपल्या दुखण्याची, एकंदर स्थितीची जाणीव नाहीं असं म्हणणं वेडेपणाचं होईल. आपल्या रोगाच्या सांसर्गिक दोषानं माझी हत्या करण्याची त्याची वागणूक किती भयंकर ?

रात्रीचा तो प्रकार मी दुसऱ्या दिवशीं डॉक्टरांच्या कानांवर घातला आणि अशा परिस्थितींत मी इथं रहावं की नाहीं तें त्यांना विचारलं.

त्यांच्यापैकीं एकानं क्षणभर आश्चर्यानं स्तंभित होऊन माझ्याकडे पाहिलं आणि आपले खांदे वर सरकाविले.

दुसऱ्या एका रुक्ष, भावनाशून्य डॉक्टरनं माझ्या तोंडावर धुराचा दुर्गंधीयुक्त भपकारा सोडला आणि बेपर्वाईच्या स्वरांत म्हटलें,

" हें पहा, असा कांहीं प्रकार नाहीं कीं, इथं रहाण्याबद्दल आपणावर तो सक्ती करतो."

फक्त आमचे वृद्ध डॉक्टर सौजा यांची वागणूक बरीच सहानुभूतीची दिसली. त्यानं माझे हात हातांत घेऊन ते मृदुपणें दाबले नी त्यांचं चुंबन घेऊन म्हटलं,

" माझ्या मुली, जर तुझं त्याच्यावर प्रेम आहे तर येथून जाणं तुला मरणप्राय होईल आणि प्रेम नसल्यास इथं राहणं जिवंत मरण वाटेल तुला ! "

माझ्या मित्रा, तुला सगळं कांहीं सांगतें. तुझ्याजवळ माझं अंत:करण उघडं करतें. माझ्या पतीवर माझं मुळींच प्रेम नाहीं. असा दचकूं नकोस. ही वस्तुस्थिति आहे. मी जर त्याच्यावर प्रेम केलं असतं, तर त्याच्या प्रत्येक चुंबनागणिक विषाचा घोट घेतांना, त्याच्या तापाच्या दाहक स्पर्शानं होरपळून निघतांना, दिवस न् दिवस तास न् तास माझं यौवन, माझं सौंदर्य, माझं आयुष्य सार्थकीं लागत असल्याचं अपूर्व समाधान मला लाभलं असतं ! पण मी त्याच्यावर मुळीं मुळींच प्रेम करीत नाहीं. उलट मी त्याचा तिरस्कार करतें. त्याच्याबद्दल मला दुर्दमनीय अनादर व तुच्छता वाटते. एवढंच नव्हे तर त्याची भयंकर चीड येते. त्याच्या बंधनांतून, त्या कुजलेल्या वातावरणांतून सुटून जाऊन स्वतंत्र व्हावं, मोकळ्या, प्रशांत, स्वच्छ वातावरणांत वावरावं आणि जगावं असं मला वाटतं.

किती भयंकर ?......असेल ! पण मला तसं वाटतं खरं ! शिवाय माझी अशी समजूत आहे कीं माझ्यासारख्या स्थितींत दुर्दैवानं सांपडलेल्या, अजाणपणें स्वत:च्या इच्छेविरुद्ध बळी पडूं पहाणाऱ्या स्त्रियांना असंच वाटत असेल. त्यांच्या डोक्यांत असलेच वंडखोर विचार नाचत असतील !

माझ्या मित्रा, तुझं अंत:करण कोमल नी फार न्यायी आहे. तरी मी यावेळीं काय करावं तें सांग. मला आतां ताप आहे. माझे ओष्ठद्वय भाजत आहेत. ह्या कागदाचा शीतल स्पर्श मला असह्य होतो. फुलं कोमेजतात आणि माझ्यापुढें मरून पडतात. मला पाहण्यास तरी तूं येत नाहींस का ? मला एकटीलाच इथं कां ठेवतोस तूं ? नी सारा समाज पण मला ह्या नरकांत रहाण्यास कां बरं सांगतो ?

तुझी हतभागिनी

जुलियेत

लेखक—**ज्यूलियु दांतश्**

अनुवादक—**श्यं. अ. पै रायकर**

# पूर्ण स्त्री

जाकॉब बॉक हे हॉलंडमधील ज्यू गृहस्थ सतराव्या शतकांतील जगांतल्या धनाढ्य माणसांत एक गणले जात. एकदां त्यांनीं व्हेनिस शहरांतील एका सुप्रसिद्ध हॉटेलांत मुक्काम केला होता.

सायंकाळचा प्रसंग. शहरांतील बागांमधून सुटणारा विविध फुलांचा सुवास, गुलाबांच्या ताटव्यांवर पडलेले सोनेरी किरण, आणि कलावंत चित्रकारानें काढलेल्या उत्कृष्ट चित्राप्रमाणें वाटणारें दाट पसरलेलें दहिंवर, शहराच्या मोठ्या कालव्याकरून फिरावयास चाललेल्या जाकॉबसाहेबांना दिसलें. मनोहर सृष्टिसौंदर्य पाहिल्यावर त्यांना फार आनंद झाला. ते आपल्या बरोबरच्या मित्रास म्हणाले,

"तुमच्या व्हेनिस शहरांत उत्कृष्ट चित्रकार कोण आहे?"

"उत्कृष्ट चित्रकार! अर्थात तिसियानु–चित्रकारांचा राजा."

"तिसियानुची गोष्ट सोडून द्या. त्यानं आपल्या हयातींत चमत्कृतिपूर्ण केलेलं चित्रण मला ठाऊक आहे. दुसरा एखादा नाहीं का?"

"आपल्याला पहावयाचं असल्यास व्हेरोनेज्रु, तिंतोरेतु व जिवोर जीवन ह्यांच्या समाधि पाहून येऊं!"

"पण आज व्हेनिस शहरांत एखादासुद्धां हयात चित्रकार नाहीं का?"

"मुळींच नाहीं."

इतकें म्हणून त्यानें आपला ओव्हरकोट सावरला आणि आपल्या वसतिस्थानाच्या दिशेनें रस्ता सुधारला. जाकॉबसाहेबांनीं त्याच्या हालचालीकडे बराच वेळ पाहिलें. त्याचें उत्तर आणि वर्तन चमत्कारिक होतें. इतक्यांत त्यांच्याबरोबर असलेला नोकर जरा पुढें येऊन अदबीनें म्हणाला,

"जाकॉबसाहेब! मी एका चित्रकाराला ओळखतों."

"तूं ?"

"हो ! तो वृद्ध असून, त्यानं तिसियांनुची कला सात्मसात केलेली आहे."

"त्या वृद्धाला स्त्रियांचीं चित्रं काढतां येतात का ?"

"इटलींतल्या सर्व चित्रकारांना स्त्रियांचीं चित्रं काढतां येतात."

जाकॉबसाहेबांना आनंद झाला. त्यांनीं आपल्या पिवळट दाढीवरून हात फिरविला आणि हातांत असलेली छत्री खांद्यावर टाकली. कालव्यावरून पारव्यांचीं जोडपीं दाणे टिपीत होतीं.

जाकॉबसाहेब त्याचा हात आपल्या हातांत घेऊन प्रेमानें म्हणाले,

"मग, असा जर चित्रकार असेल तर आपण जरा तिकडे जाऊं या ना !"

* * *

थोड्या अवकाशानें झुयेका बागेजवळ त्यांची गाडी थांबली. जाकॉबसाहेब आणि त्यांचा सोबती हे दोघेहि अरुंद वाटेनें मातो पोंझान यांच्या चित्रशाळेंत आले. उंच शिडीवर उभा राहून एका देवदूताच्या चित्राला शेवटचे रंग भरीत असलेला चित्रकार त्यांना दिसला. मळकट पण तांबड्या रंगाच्या प्रावरणावर त्याची पांढरी शुभ्र दाढी एखाद्या ख्रिस्ती पाद्र्याच्या दाढीप्रमाणें विलसत होती; आणि त्यामुळें आपोआप त्याच्याविषयीं आदर उत्पन्न होत होता. शिडीच्या खालच्या पांवड्यावर उग्र डोळे व केतकी वर्ण असलेला एक तरुण चित्रकार फलकावर इतर सा..नासह खालचें चित्रण करीत होता.

"मातो मास्तर, हे जाकॉब बॉक हॉलंडमधील एक व्यापारी असून ते आपल्याला भेटण्यासाठीं आले आहेत. आमच्या धनीसाहेबांकडे ते उतरले आहेत."

वृद्ध चित्रकारानें खालीं उतरून त्यांस अभिवादन केलें. जाकॉब साहेबांना त्यानें खुर्ची दिली. आणि दुसऱ्याला तिपायीवर बसविलें. आपल्याकडे बडी मंडळी आल्याचा त्याला आनंद झाला होता.

"आपण आल्याबद्दल मला आनंद होत आहे. काय हुकुम आहे आपला ?"

जाकॉबसाहेबांनीं त्याच्याकडून आपल्याला एक चित्र काढून घ्यावयाचें असल्याचें सांगितलें.

" माझ्याकडून ? "

" हो. मला जर चित्र आवडलं तर त्याच्या वजनाइतकं सोनं मी बहाल करीन." देवदूताच्या सुंदर चित्राकडे पहात त्या श्रीमंत व्यापाऱ्यानें आपलें म्हणणें सांगितलें.

" आपण हॉलंडमधून आलांत का ? "

" ॲमस्टॅडमहून आलों आहें मी. "

" आणि कलावंत चित्रकारांच्या जन्मभूमीहून आलेले आपल्यासारखे दाते व्हेनिसच्या भिकार चित्रकाराला आपलं काम देतात म्हणजे नवल नाहीं का ? "

" सुंदर स्त्रियांचीं चित्रं काढण्याची कला त्यांना साधलेली नाहीं. "

" विख्यात रॅम्ब्रां ह्यांना स्त्रियांचीं चित्रं साधत नाहींत ? आणि हारलेंचा मास्तर यांनासुद्धां ? "

" एकालाही स्त्रियांचं सौंदर्य साधत नाहीं ! "

" आपणाला एखादा फोटो पाहिजे का ? "

" नाहीं. मुळींच दोष नसलेलं एका स्त्रीचं चित्र मला पाहिजे आहे. "

" दोष नसलेल्या स्त्रीचं ? "

त्या चारहि व्यक्ति एकमेकांकडे पाहूं लागल्या. जाकॉबसाहेब आपल्या रुपेरी छडीवर बोटांनीं चाळा करूं लागले. आणि मातो मास्तरला व्यापाऱ्याच्या एकंदर वर्तनावरून नवल वाटूं लागलें. त्यानें अशी घटना पूर्वीं कधींच पाहिली नव्हती.

" पण, चित्र एका नग्न स्त्रीचं हवं का ? " शांतपणें चित्रकार उद्गारला.

" अगदीं नग्न ! "

" आणि जगांत एकादीसुद्धां स्त्री दोषरहित असेल असं आपल्याला खात्रीपूर्वक वाटतं का ? परमेश्वरालासुद्धां निर्दोष कलाकृति साधलेली नाहीं. "

" आपण हें काम घेतां किंवा—" उठतां उठतां साहेब उद्गारले.

वृद्ध चित्रकारानें जरा अंग हालविलें. रंगांचे डाग आणि सुरकुत्या पडलेले त्याचे हात कापूं लागले.

" मी तीन महिने या शहरांत असेन. हॉलंडला परतण्यापूर्वी इथं मी एकदां येईन. आणि त्यावेळीं मला आपलं काम पसंत पडलं तर मी आपणाला त्याच्या वजनाइतकं सोनं देईन. पोपसुद्धां आपल्याला इतकी किंमत कधीं देणार नाहीं !"

चित्रकार बोलला नाहीं. पण इतक्यांत त्याचा शिष्य—जिवोवनी यानें आपल्या गुरूकडे पाहिलें. चित्रकार स्तब्ध होता. त्याच्या स्तब्धतेमुळें इतक्या किंमतीचें काम परत जाणार हें पाहून, तरुणांत असूं शकणाऱ्या धाडसी वृत्तीनें तो पुढं झाला.

" मातो मास्तरांनीं हें काम पत्करलं आहे. "

* * *

त्यानंतर त्या वृद्ध चित्रकाराला निर्दोष स्त्रीची मूर्ति आपण कशी तयार करूं शकूं ह्याची काळजी लागली. त्याला सुखाची झोंप येईनाशी झाली.

त्याला एखादा नमुना मिळण्याची पहिली अडचण होती. जवळजवळ परमेश्वराचें स्वरूप त्या तैलचित्रांत त्याला दाखवावयाचें होतें. आणि म्हणून त्यानें मोठमोठ्या सरदार लोकांच्या आणि इतर सुंदर स्त्रियांच्या चेहऱ्याचें अवलोकन केलें होतें. पण त्यांत त्याला कांहीं पसंत पडलें नाहीं. दिलेला शब्द पाळण्यासाठीं रानटी स्त्रियांपासून सुधारणेच्या शिखरास पोंचलेल्या स्त्रियांपर्यंत त्यानें निरीक्षण केलें. कोणतीही जात किंवा वर्ण त्यानें ठेवला नाहीं. बसल्या बसल्या खिडकींतून त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या स्त्रियांकडे पहावें. पण एकहि त्याला पसंत पडेना.

त्याच्या शहरांत पिया आरनानी या नांवाची एक सुंदर तरुणी होती. अनेक कवींनी तिच्या शरीरसौष्ठवाची तुलना परमेश्वराच्या स्वरूपाशीं केलेली ऐकतांच त्यानें तिला जाऊन पाहिलें. आणि त्यावेळीं तो पूर्वीच्याहून फार कष्टी झाला. त्यानें आंत काम करीत असलेल्या आपल्या शिष्यास हांक मारली.

" जिवोवनी, चित्र रंगविण्याचा बेत रहित केला आहे मी. "

" कां बरं मास्तर ? "

" नमुना मिळत नाहीं कुठं. "

" मी पुष्कळ नमुने पाहिले आहेत आणि तेहि फार सुंदर आहेत ! "

" पण एकही पूर्ण नाहीं. मी कसं पूर्ण चित्रण करूं, कीं जिथं परमेश्वर सुद्धां दोषमुक्त नाहीं ? "

सूर्य मावळत चालला होता. समोरच्या घड्याळांत तास वाजलेले ऐकूं येऊं लागले. सुवर्णमय आकाशांत पाखरें उडतांना मौज दिसत होती. जिवोवनीनें आपले उग्र डोळे वृद्ध चित्रकाराकडे रोखले. तो म्हणाला,

" मास्तर साहेब, हा आपला शेवटचा शब्द ना ? "

" हो ! हा माझा शेवटचा शब्द आहे. मी तें चित्र रंगाविणार नाहीं. "

" तर मग मी तें काम करतों. "

* * *

पुष्कळ दिवसपर्यंत जिवोवनीनें आपल्याला खोलींत कोंडून घेतलें. आपल्या गुरूनें नाकारलेल्या नमुन्यांपैकीं एक सुंदर नमुना घेऊन त्यानें काम करण्यास सुरवात केली. आपल्या गुरूला आपलें काम दिसूं नये म्हणून त्यानें पुष्कळ खबरदारी घेतली होती.

एक दिवस दारूनें भरलेला रुप्याचा प्याला घेऊन जिवोवनी आपल्या गुरूजवळ येऊन म्हणाला,

" माझ्या कामास यश चिंतण्यासाठीं आपण हें घ्या ! "

" म्हणजे तूं तें तयार केलंस का ? "

" हो. "

" आणि तुला खात्री आहे ना, कीं आपण एका पूर्ण स्त्रीचं चित्र रेखाटलं आहे म्हणून ? "

" मी मानसशास्त्र पढलेलों आहें. पूर्णत्व हें वाढविण्यापेक्षां काढून दाखविण्यांतच सोपं असतं. "

म्हणीचा अर्थ लक्षांत न घेतां चित्रकारानें त्याला वेड्यांत काढलें. मग प्याला ओठाला लावून संपवल्यावर तो शिष्यामागून त्याच्या खोलींत जाऊं लागला.

" क्षमा करा मास्तरसाहेब. हॉलंडचे व्यापारी येण्यापूर्वी मी तें कोणाला दाखवूं इच्छित नाहीं. "

" मलासुद्धां ? "

" हो, आपणालासुद्धां ! "

* * *

कांहीं दिवसांनीं, तीन महिने पूर्ण झाल्यावर, जाकॉबसाहेब त्यांच्याकडे विचारपुस करण्यास आले. भव्य आणि रांकट व्यापाऱ्याची मूर्ति पाहून वृद्ध चित्र-

कारानें आपल्याला नमुना मिळाला नसल्यानें चित्र काढण्यांत आलें नसल्याचें सांगितलें. थोडा वेळ थांबून अधिक स्पष्टीकरणार्थ तो म्हणाला,

" आमच्या शहरांत सौंदर्यसंपन्न स्त्रियांत कांहींना कांहीं दोष असल्यानं आणि पूर्ण स्त्री तितक्या मुदतींत मला मिळाली नसल्यानं चित्र काढण्यांत आलं नाहीं. पण आपली इच्छा या माझ्या तरुण शिष्यानं पुरविली आहे. "

" खरंच का ? " आश्चर्यानें साहेब म्हणाले. " खरंच तूं असं दोष नसलेल्या स्त्रीचं चित्र काढलंस का ? "

" हो. "

" तर मग, चला. आपण तें पहायला जाऊं. "

ते तिघेही जिवोवनी काम करीत असलेल्या खोलींत आले. खोलींत मोठे मोठे चित्रफलक उभे केले होते. सर्वांच्या मागें असलेला जिवोवनी एकदम पुढें आला. पांढऱ्या कपड्यानें आच्छादलेलें चित्र त्यानें उघडें करून त्यांच्या समोर धरलें. तें एका सुंदर व्हेनिशियन स्त्रीचें—मस्तक नसलेलें चित्र होतें.

" याला मस्तक नाहीं." वृद्धानें कंटाळवाण्या स्वरांत ओरडून म्हटलें.

" रानटी ! " जाकोबसाहेबहि गर्जले. " या अशा सुंदर देहाला मस्तक तेवढं कां केलं नाहींस ? "

जिवोवनी सस्मित न घाबरतां तेथेंच उभा राहून म्हणाला,

" साहेब, आपणाला निर्दोष स्त्री पाहिजे होती ना ? मस्तक हा बायकांचा सर्वांत मोठा दोष आहे ! "

लेखक—**ज्यूलियु दांतश्**

अनुवादक—**का. पुं. घोडे**

# रवि आणि रजनी

प्रिय आत्या कार्लिता,

माझ्या गुलाबी रंगाच्या खोलींत बसून अगदीं रडतच मी हें पत्र तुला लिहीत आहें नी माझ्यासमोर कालच आलेलं तुझं प्रेमळ पत्र उघडंच आहे.

तुझे धन्यवाद मला घेतां येत नाहींत किंवा तुझ्या गोड चुंबनाचाही मला स्वीकार करतां येत नांहीं. कारण मी अभागिनी आहें.

मला कधींच वाटलं नाहीं, कीं पुरुष जात इतकी चमत्कारिक, अद्भुत, स्त्रियांच्या भावनांशीं समरस न होणारी असेल !

लुईश किती प्रेमळ, किती आनंदी अन् खेळकर दिसत होता ! पण तसा तो नाहीं. भरल्या डोळ्यांनीं मी पुन्हां सांगतें, कीं तो तसा नाहीं.

...आणि जिला तीन पुरुषांची पत्नी व्हायचं दुर्दैव लाभलं व आपल्या डोळयांदेखत त्यांचा अंत पहाण्याचं सुदैव लाभलं (परमेश्वर मला क्षमा करो !) त्या माझ्या आत्या, तुला तरी माझं म्हणणं पटेल अशी मला खात्री आहे.

वेड्या प्रेमाला भाळून मी विवाहबद्ध झालें. इतर सर्वसाधारण मुलींप्रमाणं, प्रेमासंबंधीं फारसा खोल विचार मीही केला नाहीं...कल्पना केली...दुर्दैव माझं ! ...मला वाटलं, प्रेम करणं म्हणजे वसंतऋतूंत चिरंतन विहार करणं, कल्पांता-पर्यंत हंसत खिदळत गात रहाणं किंवा असंच कांहीं तरी, कीं त्यापासून फक्त मृत्युच काय तो वंचित करूं शकेल !

अगदीं लहानपणापासून प्रेमासंबंधीं माझी कल्पना फार उच्च व शुद्ध होती. वैवाहिक आयुष्य म्हणजे निरभ्र आकाशांतून पक्ष्याचं गोड परिभ्रमण ! सारं कांहीं मधुर, मंगल, सुंदर अर्थात् सत्य !

विवाहापूर्वी माझ्या मनोभूमिकेवर सुखद कल्पनांचे उंच उंच मनोरे मी उभारले होते. संध्याकाळ झाली, कीं हातांत हात घालून, पतिसमवेत आपण मग मजेंत फिरायला जाणार, निरनिराळ्या थिएटरांत जाऊन निरनिराळे बोलपट पहाणार; खूप खूप बोलणार; वारंवार परस्परांचीं गोड गोड चुंबनं घेणार; चांदण्यांत गमतीनं विहार करणार—एक ना दोन!...पण माझे ते उंच उंच मनोरे आतां पार ढांसळून गेले आहेत; अगदीं जमीनदोस्त झाले आहेत.

आत्या कार्लिता, तुला ठाऊकच आहे कीं मी सुंदर आहें. अगदीं शंभर स्त्रियांत उठून दिसेन इतकी सुंदर आहें. गेल्या सहा महिन्यांपूर्वी माझा अठरावा वाढदिवस साजरा झाला व मी माझ्या लुईशशीं लग्न केल्यास नुकतेच दोन महिने गुजरले आहेत.

माझा केवढा भ्रम होता तो! अखेर हें सारं मृगजलच ठरलं म्हणायचं! ज्याच्याशीं मोठ्या उमेदीनं लग्न लावलं तो पत्नीसाठीं तळमळणारा प्रेमवेडा नवरा नव्हे! तर तो एक इंजीनियर, विद्वान, रुक्ष, व्यवहारी, अरसिक व शिस्तप्रिय असा आहे. त्याचे डोळे निळे-काळे असले, तरी त्यांत खेळकरपणा किंवा चांचल्य बिलकुल नाहीं, तर पराकाष्ठेचा घुमेपणा दिसतो. त्याच्या नाजुक चेहऱ्याला त्यानें ठेवलेल्या त्या हिटलरी मिशा शोभत नाहींत; व त्यामुळें त्याच्या मुखावरील मार्दव अजिबात लुप्त होऊन गेलं आहे.

लुईश नेहमीं, दिवस व रात्र आपल्या लिहिण्याच्या खोलींत किंवा टेक्निकल् रूममध्यें एकटाच बसून गणितांतील मोठमोठीं प्रमेयं सोडवीत अथवा रेडियोच्या, इलेक्ट्रिकच्या यंत्रांशीं तल्लीनतेनं कसलेतरी प्रयोग करीत असतो. रात्र फार झाली तर काम करतां करतां किंवा आरामखुर्चीवर बसून विविध वर्तमानपत्रें वाचतां वाचतां अधुनमधून तो डुलक्या घेतो.

माझ्या प्रिय आत्या, तो मनुष्य नाहीं तर एक यंत्र आहे असं मी म्हणेन!

तो पक्का व्यवहारी आहे. भावना, प्रेम या कोमल विकारांना त्याच्या अंतःकरणांत जागाच नाहीं मुळीं! आरोग्यासंबंधींचे नियम फार कडक रीतीनं पाळले गेले पाहिजेत असा त्याचा कटाक्ष आहे. उभयतां पतिपत्नींची शय्या पृथक पृथक असावी या मताचा तो कट्टा पुरस्कर्ता आहे.

मला तर त्याची अशी सक्त ताकीद असते, कीं कोंबडया झांकून ठेवतात त्यावेळीं मीं झोपावं नी मोठ्या पहांटेस उठून व्यायाम घ्यावा.

पण, जर तो माझ्या आवडीनिवडीकडे, भावनांकडे थोडं तरी लक्ष पुरविता, माझ्या हृदयाच्या हांकेला ओ देता, तर त्याची तीं शिस्त, तो व्यायाम, तीं प्रमेयं, तीं वर्तमानपत्रं, सारं सारं कांहीं मी मुकाट्यानं सहन केलं असतं! पण...नाहीं... माझ्या प्रिय आत्या, हें सत्य—हें कटु सत्य मी तुला—माझ्या हृदयाला—निवेदन करीत आहें, कीं माझा पती माझा तिरस्कार करतो, माझ्या प्रेमळ, गोड शब्दांनीं त्याचं स्वास्थ्य एकदम बिघडून जातं; माझ्या हावभावांचा, लडिवाळपणाच्या वागणुकीचा त्याला कंटाळा येतो, व एखादे वेळीं उपहासानं, तिरस्कारानं हंसून तो मला उपदेश करतो—

" वेडी आहेस तूं आनीत! असा फाजिलपणा तुला शोभत नाहीं आतां!"

पण आत्या, मी वेडी नाहीं किंवा फाजीलही नाहीं. सर्व कांहीं तुला मी आतां मोकळ्या मनानं सांगणार आहें; तुझ्यापाशीं मी माझं हृदयाविष्करण करणार आहें. अगदीं क्षुल्लक गोष्टी!...कदाचित् त्या तशा असतीलही! पण एका स्त्रीचं वैवाहिक सौख्य ठरविण्यास त्या पुरेशा आहेत.

लुईशला मी असं एकही चुंबन दिलं नाहीं, कीं ज्यामुळं त्याचा चेहरा त्रासल्यासारखा झाला नाहीं. आत्यंतिक निराशेनं जेव्हां मी त्याच्यावर चुंबनांचा वर्षाव करतें, त्यावेळीं तो एकाद्या स्थितप्रज्ञासारखा स्वस्थ बसून रहातो.

पण आत्या, मला वाटतं, कीं एखादा मनुष्य अठरा वर्षांच्या तरुणीशीं लग्न लावतो तो स्वस्थ बसण्याकरतां नव्हे!

ज्यावेळीं लुईश रात्रीं बारा एक वाजतां एकटाच आपल्या खोलींत जागत बसून काम करतो, त्यावेळीं मी माझ्या मऊ मऊ पलंगावर पडून त्याची मार्गप्रतीक्षा करीत रहातें. शेवटीं मी कंटाळून जातें. निराशेनं माझा जीव व्याकूळ होतो व एकटी झोंपण्याकरतां—असं तळमळण्याकरतां—मी खास लग्न केलेलं नाहीं या विचारानं धुंद होऊन मी त्याच्या खोलीजवळ जातें; दार ढकलून आंत घुसतें व लाडिकपणानं त्याच्या गळ्यांत माझे हात अडकवून अनुनयाच्या स्वरांत म्हणतें,

" माझ्या लाडक्या लुईश, ठाऊक आहे ना तुला आतां किती वाजले ते?"

" पण तूं झोंप ना जाऊन. काय पाहिजे तुला ?"

तुझं चुंबन हवंय मला. एक गोडसं चुंबन दे ना रे लुईश!" माझ्या अशा उत्तरानं तो संतापानं अगदीं भडकून जातो; त्याच्या कामांत व्यत्यय येत आहेसं पाहून तो चिडतो व मी म्हणजे जशी कांहीं त्याची कुणीच नव्हे अशा समजुतीनं तो मला तुच्छतेनं म्हणतो,

" आनीत, इथून जा पाहूं आतां ! स्वस्थपणें घटकाभर मला काम करूं दे."

विद्ध अंत:करणानं मी मग त्याच्या इच्छेनुरूप वागतें. परत मी माझ्या खोलींत जातें. तिथं दारासमोरच लटकावलेल्या भव्य बिलोरी आरशांत, विजेच्या प्रकाशांत माझं प्रतिबिंब मला दिसतं. तें पाहून माझी मलाच मी कितीतरी सुंदर, मोहक नी आकर्षक दिसतें व इतकी मी सुंदर असून मला एकाकी जीवन कंठावं लागावं, एकलेपणाच्या आगीनं आंतल्या आंत मी जळून जावं, या व अशाच वेगवेगळ्या विचारांनीं माझं मस्तक भणाणून जातं. आणि त्या भरांत मी माझ्या पतीच्या खोलीकडे जातें व हळूच दार ढकलून त्याच्या शेजारीं जाऊन एका कोचावर बसतें. पण मला पाहिल्याबरोबर लुईशच्या कपाळाला चटकन् आंठ्या पडतात; त्या पाहून मी लगबगीनं म्हणतें, " हें पहा लुईश, मी इथं अगदीं गप्प बसतें तुझ्याजवळ; एक शब्दसुद्धां बोलत नाहीं; अगदीं खालीं मान घालून मी माझं शिवणकाम विणीत रहातें; मग तर झालं ना ?"

लुईश तें मान्य करतो व मग मी तिथं बसतें.

एक मिनीट, दोन मिनिटं, तीन मिनिटं, खालीं मान घालून मी बसतें. एका भल्या मोठ्या जाड मॅरिअन पेपरवर, त्याच्या गुलाबी रंगाच्या मांसल व दणकट हाताची होणारी मोहक हालचाल मी मुग्धतेनं पहात रहातें. त्यावेळीं त्याच्या विस्तीर्ण भालप्रदेशावर नाचणाऱ्या केसांच्या कुरळ्या बटा पाहून माझं देहभान हरपतं व मग मी एकेक पाऊल हलकेच टाकून त्याच्याजवळ जातें आणि एकदम त्याच्या गळ्याला मिठी मारतें न् मोठ्या आवेगानं त्याच्या मुखाचं दीर्घ चुंबन घेतें...आणि ...झालं !...शाईचा एक डाग पडतो त्या मॅरिअन पेपरवर ! खराब होऊन जातो तो कागद !... एक डाग !...किती क्षुल्लक गोष्ट ! जर लुईशच्या ऐवजीं त्यावेळीं दुसरा कुणी असता, तर तो स्वत:ला किती धन्य समजला असता ! माझ्यासारख्या

तारुण्यानं रसरसलेल्या एका सुकुमार युवतीनं, प्रेमातिशयानं धुंद होऊन, इतक्या उत्कटतेनं चुंबन घेतल्याबद्दल तो आनंदानं बेहोष झाला असता! होय ना ग आत्या?

पण...तो...नाहीं. तो संतापतो, चवताळतो, रागाच्या भिरकींत डोक्यावर हॅट चढवितो व मला उद्देशून ओरडून म्हणतो,

"अगदीं कमाल झाली तुझी! क्षणभर विसावा कसा तो तूं मला देत नाहींस; थोडा वेळ स्वस्थतेनं काम करीन म्हटलं, तर तूं अशी मला सतावून सोडतेस; आतां एखाद्या हॉटेलांत जाऊन मी रहातों म्हणजे मग सुटशील तूं!"

आत्या, कळलं ना तुला, मी काय सांगतें तें? जर मी त्याच्याशीं बोलूं लागलें, तर त्याची तक्रार अशी असते कीं मी कामांत मध्येंच व्यत्यय आणतें; जर चुंबन घेतलं तर गुदमरवून टाकलं असं तो म्हणतो; जर गळ्याला मिठी मारली तर आपल्याला तांदळांचं पीठ सारवलं गेलं अशी ओरड करतो; हंसलें तर मी गडबड करतें, रडलें तर त्रास देतें, आणि खेळलें तर मी लहान मूल आहें, असं तुच्छतेनं बोलून तो माझा उपहास करतो.

अशा ह्या त्याच्या विचित्र वर्तनामुळं मी अगदीं चिडून जातें आत्या. खोटं वाटेल तुला! मी मग त्याचीं अधिकच चुंबनं घेऊं लागतें; मनसोक्त रडतें; हंसतें; त्याला—त्या स्थितप्रज्ञ पुतळ्याला—मी घट्ट मिठी मारतें आणि क्षणभरसुद्धां मी त्याला उसंत देत नाहीं.

कारण खरोखरच तो मला आवडतो; जरी तो माझ्याशीं असा तुटकपणानं व फटकून वागतो, तरी तो मला हवा आहे; तो माझा आहे. त्याच्यावर माझं निरतिशय प्रेम आहे; आणि म्हणूनच त्याला तसा त्रास देण्यांत मला अननुभूत सुख वाटतं.

तुला ठाऊक आहे का, मला आज तो काय म्हणाला तें? "तुझ्यासारख्या सुंदर, तरुण, खट्याळ स्त्रीच्या प्रेमास पात्र होण्याइतका दुसरा मनस्ताप पुरुषाला नसेल!"

माझ्या प्रिय आत्या, तुला जगाचा अनुभव विशेष आहे. आतां तूंच सांग, खरंच का माझं प्रेम फाजील आहे? लुईशचं म्हणणं खरं का?

लेखक—ज्यूलियु दांतश

अनुवादक—त्र्यं. अ. पै रायकर

# स्वर्ग कुठें आहे?

माझा छोटा मित्र बॉब पांचेक वर्षांचा होता. त्याच्या डोक्याचे केंस पिंगट रंगाचे—पिंगट कसले, ते पांढरेच दिसत. त्याचे वाटोळे अन् निळे डोळे, जसे कांहीं चिनी मातीच्या भांडयाचेच बनवलेले. बॉब हंसला म्हणजे त्याच्या गुलाबी गालांवर छोट्याशाच दोन मोहक खळ्या पडत. बॉबची मूर्ति गंभीर, शरीर गुटगुटीत अन् सशक्त, वृत्ति अंतर्मुख नी भावनाशील. उघडा नागडा बॉब म्हणजे एक भीमाची छोटी मूर्तिच. बॉब कपडयालत्त्यांत फिरतांना—सफेत फ्लानेलचा कोट, काळा नेकटाय ( बॉब सध्या सुतकांत आहे म्हणून ), पायांत पहाडी लोकांप्रमाणें लोंकरीचे पायजमे—अशा पोषाखांत बॉब दिसला म्हणजे तो पुस्तकांच्या चित्रांतील छोट्या बच्च्यांची आठवण करून देई. हॅट मानेपर्यंत मागें रेंटलेली, दोन्ही हात कोटाच्या खिशांत घातलेले, ढोपरें उघडींच टाकलेलीं, अशा ऐटींत निरीक्षक व भेदक नजरेनें पहाणारी बॉबची मूर्ति जेव्हां जेव्हां माझ्या डोळ्यांसमोर उभी राही तेव्हां तेव्हां त्या तीन वीत देहांत—एक भव्य पुरुष सामावल्याचा भास झाल्याशिवाय रहात नसे.

लिस्बन शेजारच्या उपनगरांतील एका प्रशस्त बंगल्यांत बॉबचे वडील राहत असत. बॉबची एक थोरली बहीण होती. तिचें नांव नीना. ती वयानें सोळा एक वर्षांची असून दिसायला बरीच मोठी, म्हणजे बॉबच्या आईएवढी दिसे. ती तिच्याच नात्यांतील एका तरुण इंजीनियरवर प्रेमासक्त झाली होती. अन् तो तरुण बर्लिनला जायला निघण्यापूर्वी विवाहविधि उरकून टाकावा असा त्यांचा विचार होता. नीना फार सुंदर होती. अन् बॉबला तर ती आतां आईएवढी मोठी दिसत होती. म्हणून आपणही बाबांएवढा मोठा केव्हां होईन ही एकच काळजी बॉबला लागून राहिली होती. बॉबचें अशा प्रकारचें बालतर्कशास्त्र त्याला कित्येकदां जगाकडे निराळ्या दृष्टीनें पहायला लावी.

बॉबच्या पांचव्या वाढदिवशींचीच गोष्ट. बॉब आपल्या आईच्या खोलींत गेला नी सोनेरी चौकटीच्या आरशासमोर जाऊन किती तरी वेळ उभा राहिला.

" इतका वेळ इथं उभा राहून तूं काय करतोस, बॉब ? "

" मी पहातोंय. "

" काय पहातोस ? "

" मी आज मोठा होणार ना, तें पहातोंय. माझा आज वाढदिवस ना ? पण मी अजून काल होतों तेवढाच आहें. थोडासुद्धां वाढलों नाहीं ! "

* * *

पण बॉबच्या मनाचा ओढा ह्या त्याच्या मोठ्या बहिणीकडे—सुंदर नीनाकडे—फारसा नव्हता. बॉबपेक्षां दोन वर्षांनीं लहान अशी बॉबची दुसरी एक बहीण होती. ती बाहुलीसारखी नाजुक, गोड अन् लाजरी अशी होती. तिच्या केंसांत गुलाबी रंगाची फीत नेहमी बांधलेली असे. काव्यसृष्टींत वागडणाऱ्या काल्पनिक बालिकांची ती आठवण करून देई. बॉब आपल्या थोरल्या बहिणीशीं ज्या प्रेमभावानें वागे त्या भावनेनें तो ह्या धाकट्या बहिणीशीं वागत नसे. दी ( हें बॉबच्या छोट्या बहिणीचें नांव ) आणि बॉब ह्या उभयतांत बॉब फार सशक्त. दी फुलासारखी कोमल. आणि म्हणून बॉबला वाटे दीला आपल्या आश्रयाची जरुरी आहे. आपल्या आश्रयावर जगणाऱ्या व्यक्तींवरच वडील माणसांचें प्रेम असतें; इतरांवर त्यांचें खरें प्रेम असूं शकतच नाहीं. आणि वडील माणसांप्रमाणें बॉब या धाकट्या बहिणीवर प्रेम करून स्वतःला मोठ्या माणसांपैकींच समजत असे. बॉबचें दीवर पराकाष्ठेचें प्रेम होतें. दीपासून तो क्षणभरही दूर रहात नसे. तो तिला नेहमीं हातांत घेऊन फिरे. त्याला दिलेला खाऊ किंवा खेळणीं तो दीलाच देऊन टाकी. सकाळीं उठल्या-बरोबर तो दीची विचारपूस करी.

एक दिवस दी आजारी असल्याचें त्याला कळलें, म्हणून तो दीकडे जाऊं लागला. पण वडील मंडळीनें त्याला दीच्या खोलींत जाऊं दिलें नाहीं. बॉब रडला, धडपडला; पण फुकट. त्या खोलींत जायची त्याला परवानगी नव्हती. त्या खोलींतून कधीं कधीं डॉक्टर लोक येऊन जात. एकदां संध्याकाळचा बॉब बागेंत

खेळत होता. त्याला एकदम रडें ऐकायला आलें. तो धांवतच घरांत गेला. त्याची आई भोंवळ येऊन पडली होती, तिला नोकर लोक धरून आंत नेत होते. बॉबचे वडील बॉबजवळ आले नी त्याला उचलून स्फुंदत त्यांनीं त्याचा एक मुका घेतला.

दुसऱ्या दिवशीं बॉबच्या घरीं बरींच माणसें जमलीं होतीं. पुष्कळ फुलें पण आणलीं होतीं. बंगल्याच्या बाहेर बऱ्याच मोटारी उभ्या होत्या. बंगल्याच्या तळमजल्यावरील एका खोलींत दरवाजे बंद करून बॉबला ठेवून घेतला होता. पण खिडक्यांच्या कांचांतून बॉब बाहेरचा जमाव व सर्व कांहीं पहात होता. परंतु बाहेर लोक कां जमले आहेत त्याचा बॉवला कांहीं उलगडा होईना.

कांहीं दिवसांनंतर बॉबनें हट्टच धरला म्हणून त्याला दीच्या खोलींत जायला दिलें. तो खोलींत गेला. तेथें दी त्याला दिसली नाहीं. तो रडूं लागला. दीचा छोटा पलंग होता तो विस्कटून टाकला होता; खिडक्या उघड्याच होत्या; आणि देवघरांतून आणलेल्या एका चौरंगावर प्रार्थनेची एक पोथी व एक फुलांचा हार ठेवला होता.

" माझी दी कुठं आहे ? " अनावर झालेलें रडें थोडें ओसरल्यानंतर बॉबनें प्रश्न केला.

" ती स्वर्गांत आहे, बाळ."

" अन् स्वर्ग कुठं आहे ? "

आईनें त्याचा मुका घेतला. ती मंद पावलांनीं चौरंगाजवळ गेली. हात जोडून कायशी प्रार्थना पुटपुटली आणि बॉबला तिनें कांहींच उत्तर केलें नाहीं.

* * *

बॉबनें एकदां निश्चयच केला; दी जिथें असेल तिथें जाऊन तिला भेटायचें. पण ती भेटणार कुठें ? बरें, स्वर्ग कुठें आहे त्याची माहिती कोण देणार ? स्वर्ग कदाचित् जवळही असेल किंवा फार दूरही असेल. त्या दिवशीं त्यानें आईजवळ स्वर्गासंबंधीं विचारलें तेव्हां आईनें त्याला कांहींच उत्तर केलें नाहीं, तें कां ?

एकदां रात्रीची बॉबच्या घरांतील मंडळी जेवायला बसली होती. दी कुठें आहे तें आपले बाबा आपणाला सांगतील या अपेक्षेनें बॉब त्यांच्या मांडीवर जाऊन

बसला. बॉबनें वडिलांच्या कानाजवळ आपलें तोंड नेऊन हळूच विचारलें,

" स्वर्ग कुठं आहे ? "

" तुला कशाला पाहिजे त्याची चवकशी ? "

" मला दीला भेटायचं आहे..."

बॉबच्या वडिलांचे डोळे अश्रूंनीं भरून आले. त्यांनीं बॉबचा एक मुका घेतला आणि ते तसेच जेवणावरून उठले. त्या रात्रीं ते जेवलेदेखील नाहींत. बॉब अधिकच संशयांत पडला. बाबांनाही जर दीची आठवण होते, तर तिच्या शोधार्थ ते माणसें कां पाठवीत नाहींत ? स्वर्ग म्हणजे तरी काय ? गुलाबाच्या फुलांनीं भरलेला बगीचा ? का मेवामिठाईचें दुकान ? का खेळणीं बाहुल्यांचा पसारा ? अन् गरीब बिचारी दी तिथें सुखांत, आनंदांत असेल काय ? दी गेली तेव्हांपासून घरचा सर्व आनंद नष्ट झाला होता. पण, स्वर्ग कुठें आहे तें कोणीच सांगत नाहीं तर बॉबला तरी तो कुठून माहीत होणार ?

तो रविवारचा दिवस होता. सकाळचीं बागेंतलीं फुलझाडें नुकतीच फुलायला लागलीं होतीं. बंगल्यांतील देवमंदिरांत पूजा करण्याकरतां त्यांचा वृद्ध पुजारी त्या बाजूनें येतांना बॉबला दिसला. त्या दिवशीं लोक दीला घेऊन गेले होते तेव्हां तो पुजारीही तेथें हजर होता. त्याची बॉबला आठवण झाली. बॉबनें धांवतच जाऊन त्या पुजाऱ्याच्या पायाला मिठी मारली आणि रडतच विचारलें,

" स्वर्ग कुठं आहे तें बाबा नि आई मला कां हो सांगत नाहींत ? "

" कदाचित् त्यांना माहीत नसेल, बाळ."

" पण तुम्हांला माहीत आहे काय ? "

" खरंच, मलासुद्धां माहीत नाहीं..."

* * *

त्या तरुण इंजीनियरनें नीनाला मागणी घातली होती. पुढच्याच महिन्यांत त्यांचा विवाह व्हायचा होता. स्वैर पांखरांप्रमाणें तीं उभयतां त्या बागेंत हंसत, गात, बागडत. तो फेब्रुवारी महिना होता. अस्मानांत वसंतऋतूच्या आगमनाची तयारी होत होती. बागेंतील मधुर हिरवळींतून, शुभ्र व गुलाबी फुलांनीं बहरलेले

बदामवृक्ष त्या सुखी प्रणयी जोडप्याच्या मधुर मीलनाची पूर्वसूचना देत होते. एकदां नीना व तिचा प्रियकर संध्याकाळचीं हिंडून फिरून दमलीं होतीं, म्हणून फुलांनीं बहरलेल्या एका बदामाच्या झाडाच्या छायेखालीं, एका दगडी बांकावर जाऊन तीं बसलीं. हीच जागा त्यांना विशेष प्रिय होती, कारण तेथून बंगल्याची बाजू फारशी दिसण्यांत येत नव्हती. दूषित लोकदृष्टीपासून तीं दूर जाऊन बसलीं असल्याकारणानें, असें वाटे कीं, त्या उभय प्रेमिकांची प्रेमगांठ प्रत्यक्ष परमेश्वराच्या हातांनीं बांधली जात आहे. नीनानें आपलें मस्तक आपल्या प्रियकराच्या बाहूवर ठेवलें होतें; अन् त्या तरुणानें आपले ओंठ प्रथमच आपल्या प्रेयसीच्या ओंठावर ठेऊन....तीं उभयतां, तारुण्यप्राप्त, कोमल, कंपित मुखांतून पहिल्या चुंबनाचें सुमधुर संगीत आळवीत होतीं—इतक्यांत, मंत्रशक्तीनें प्रकट झाल्याप्रमाणें, बॉब अकस्मात् त्यांच्यासमोर उभा ठाकला !

"ओहो !"

गोंधळाचा पहिला क्षण ओसरल्यानंतर नीना बॉबवर फारच संतापली. बॉब आपल्या पाळतीवर आहे असा तिला भलताच संशय आला. अन् त्याच्याविरुद्ध आईजवळ तक्रार करण्याची तिनें त्याला धमकी पण दिली. परंतु तिचा प्रियकर तिच्याएवढा भावनेला वळी पडणारा नव्हता. तो हंसला आणि त्यानें बॉबला आपल्याजवळ ओढून त्याचे केंस कुरवाळीत म्हटलें,

"बॉब फार चांगला मुलगा आहे, हं ! बॉब उगीच राहिला तर मी त्याला एक घोडा विकत घ्यायला पैसे देईन."

"मला घोडा नको."

"तर मग एक मोटर विकत घ्यायला पैसे देईन."

"मला मोटर पण नको."

"मग काय पाहिजे तुला ?"

बॉबनें गंभीर मुद्रा केली. त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले. तो म्हणाला,

"स्वर्ग कुठं आहे तें तुम्ही मला सांगितलं पाहिजे."

तरुण इंजीनियरने नीनाकडे प्रेमभरानें पाहिलें. क्षणापूर्वीच अनुभवलेल्या चुंबनाचा स्वर्गीय सुगंध आपल्या ओंठांना स्पर्शून गेल्याचा त्याला भास झाला.

त्यानें नीनाला आपल्या करपाशांत घेऊन कुरवाळीत म्हटलें,

"तुला माहीतच नाहीं काय स्वर्ग कुठं आहे तो, बॉब ?"

"नाहीं."

"इथंच..."

* * *

त्या प्रेमी जोडप्यानें आपली सहल पुढें चालू करण्याचा बहाणा करून थोड्याच वेळानें तेथून पाय काढला. कारण आश्चर्यातिरेकानें, डोळे मोठे करून, बॉब उभा होता तो तेथून हलेना. शेवटीं, स्वर्ग इतक्या जवळ, त्या दगडी बांकावर, त्या फुलांनीं भरलेल्या झाडाखालीं आहे तर !—बॉब विचार करीत होता. अन् ही माहिती त्याला आणखी कुणी दिली असती ! संध्याकाळच्या शांत वायुलहरींनी बदामाचीं फुलें कष्टानें गळून पडत होतीं. अन् नीना व तिचा प्रियकर एकमेकांच्य हातांत हात घालून संध्याप्रकाशाच्या सोनेरी किरणांपासून दूर दूर जात होतीं.

रात्र झाली होती. बॉबच्या घरची मंडळी जेवायला बसली होती. त्या मंडळींत बॉब दिसला नाहीं म्हणून त्याची चवकशी करण्यांत आली. बंगल्याच्या आसपास त्याला शोधला. पण बॉब कुठें सांपडेना. त्याचे आईबाप काळजींत पडले. परंतु...बॉब संध्याकाळीं त्या दगडी बांकाजवळ उभा होता, त्याची नीनाला आठवण झाली. लगेच बॉबचे वडील एक गडी बरोबर घेऊन त्या बाजूला गेले. बाहेर चांदणें स्वच्छ पडलें होतें. इतकें कीं दिव्यांची जरुरीच भासत नव्हती. तेथें बॉबची मूर्ति थंडीनें कुडकुडत, त्या बांकासमोर अजून उभी होती. चांदणें व बदामाचीं फुलें, बारीक रुपेरी बरसादीप्रमाणें, बॉबवर पडत होतीं...

"ह्या अवेळीं तूं इथं काय करतोस, बॉब ?" त्याचे वडील ओरडले.

अन् कंपित व रडक्या स्वरांत भीत भीत बॉब म्हणाला,

"मी दीची वाट पहात आहें."

लेखक–ज्यूलियु दांतश्

अनुवादक–द. वा. नाईक

# जगायचं आहे म्हणून !

" हा तुझा मुलगा का ? "

" हो. "

" काय वय आहे त्याचं ? "

" पुढल्या महिन्यांत पांच वर्षं पुरीं होतील त्याला; पण तितक्या वयाचा नाहीं दिसत तो ! होय ना ? इवलासा निस्तेज जीव जन्माला आला होता. पुढं मागं तो जगेल वांचेल अशी आशा मी केव्हांच केली नव्हती. दोन वर्षंपर्यंत एखाद्या लोढण्यासारखा माझ्या गळ्यांत अडकवला गेला होता तो ! तिसरं वर्ष सुरू झालं तरी त्याला धड बसतांही येत नव्हतं. सदाच आजारी, नेहमीं खरुजीनं अंग फुललेलं ! त्याचा बाप क्षय होऊन वारला होता. असले आजार म्हणे आनुवंशिक असतात. देवाला पाहिजे तसं होईल. मला जें कांहीं शक्य आहे तें करायला मी मुळींच कसूर करींत नाहीं. जें काय मी मिळवतें तें केवळ या अभागी दुर्बल प्राण्यासाठीं ! पण माझी मिळकत ती कितीशी ! टीचभर पोटाची खळगी भरायलासुद्धां ती अपुरी पडते. ' मॅटर्निटी होम ' मधें जातांना त्याला माझ्या सोबतिणीच्या हवालीं करून मला जावं लागलं होतं. सृजनदेवता होण्याचा सन्मान फिरून एकवार माझ्याकडे चालून आला होता ना ? या खेपेस झालेलं मूल जन्मतःच मेलेलं होतं. नव्या मोहाचे पाश माझ्याभोंवती घालायला त्या निष्प्राण देहानं डोळे उघडून माझ्याकडे पाहिलंच नाहीं...हो ! काय सांगत होतें मी ? हं ! जेव्हां मी 'मॅटर्निटी'तून निघून घरीं आलें तेव्हां माझ्या डोळ्यांसमोर दाट अंधारी आली. डोळ्यांतून अश्रू ओघळूं लागले. मला हुंदके आवरेनात. अरेरे ! काय सांगूं तुम्हाला माझ्या ह्या बाळाची त्यावेळची स्थिती ! नुसतीं हाडं न् कातडी यापलिकडे कांहींही शिल्लक राहिलं नव्हतं त्याच्या शरीरांत. त्याचे मोठाले डोळे त्या स्थितींत अतिशय भेसूर अन् केविलवाणे

दिसत होते. त्यांना माझी ओळख पटत नव्हती अन् त्यांतून सारखीं टिपं गळत होतीं. पुरेशा आहाराभावीं त्याची अशी शोचनीय अवस्था झालेली स्पष्ट दिसत होती. माझ्या त्या चांडाळ सोबतिणीनं त्याची उपासमार करीत राहून त्याला शेवटीं अशा रीतीनं अमानुषपणं मृत्यूच्या कराल जबड्यांत फेकून दिलं होतं. परंतु त्याच्या आयुष्याची दोरी बळकट होती म्हणून म्हणा किंवा अन्य कांहीं कारणानं म्हणा तो त्याही स्थितींतून बचावला. आतां बिचारा पहा, तिथं शांत झोपला आहे ! बिचारं अर्भक किती किती चांगलं आहे म्हणून सांगूं तुम्हांला ! एका कोपऱ्यांत पडून स्वतःशींच खेळत तो दिवसामागून दिवस घालवतो. जेव्हां त्याला भूक लागते किंवा कुठं तरी दुखतं खुपतं तेव्हांच कुठं तो रडतो; पण तेंही किती निस्तेजपणं !

" आणि रात्रींचाही इथंच झोपतो का ? "

" हो तर ! "

" अन् मधेंच जागा झाला तर ? "

" च्......च्... अगदींच भाबडा आहे तो ! ...कांहीं कळत नाहीं त्याला...हं ! ही माझी एकाकी जागा पहातांच तुम्हीं...या स्थितींत खितपत पडतांना जीवाचा कसा तडफडाट होतो तें माझं मलाच ठाऊक !...त्या खिडकींत नशिबाची वाट पहात किती तरी वेळां रात्रीच्या रात्री मी उभी रहातें. माणूस प्राप्त परिस्थितीप्रमाणं जगत असतो; आपल्या इच्छेप्रमाणं नव्हे. जग हें असंच आहे, नाहीं का ? मी नेहमी म्हणतें कीं हा माझा बाळ पुढं मागं सुखी व्हायचा असेल तर होईल; पण त्याचं अदृष्टच निराळं असल्यास सोन्याच्या पाळण्यांत जरी तो जन्माला आलेला असला तरी त्याच्या वांट्याला यायचं दुःख कदापि चुकायचं नाहीं. माझ्या स्वतःच्या अनुभवावरून सांगतें मी...अतिशय प्रसिद्ध अशा कॉलेजांत माझं शिक्षण सुरूं झालं होतं. माझ्या बरोबरीच्या कॉलेजमैत्रिणी सध्यां हवाशीर, टुमदार, विलासी बंगल्यांत ऐषारामांत रहातांना, रोल्सराइस मोटारींतून फिरतांना मी पहातें. अन् मी !... तुम्हाला वाटत असेल. पपांच्या—माझ्या वडलांच्या मृत्यूनंतर सगळं कांहीं पार बदलून गेलं. ममीनं कॉलेजमधून काढून घेतलं मला अन् एका रंगेल इसमाच्या गळ्यांत स्वतःला अडकावून घेतलं ...थोड्याच अवधींत त्या इसमानं माझ्या पपांची सगळी इस्टेट धुळीला मिळविली. अन्...अन् शेवटीं

मलाही! बरं वाईट समजण्याची पुरेशी अक्कल मला नव्हती त्यावेळीं! पंधरा वर्षांचं वय असेल माझं त्यावेळीं फार तर...लज्जेनं, शरमेनं मेल्याहून मेल्यासारखं आम्हाला झालं. समाजांत तोंड काढून फिरायला जागा राहिली नाहीं. पोलीस चौकींत वारंवार आम्हाला खेपा घालाव्या लागल्या. वर्तमानपत्रं विकणारीं पोरं तर पहांटेस आमचीं नांवं घेऊन ओरडूं लागलीं...कोर्टात खेचण्याची, तुरुंगांत रवानगी करण्याची भाषा लोक बोलूं लागले. मला भीति वाटायला लागली. सगळीकडे अंधार दिसूं लागला. अन् मग एके रात्रीं मी घरांतून पळ काढला...चार महि-न्यांची गरोदर होतें मी त्यावेळीं! जाणार कुठं? सगळीकडे वणवण हिंडलें. आज एका घरांत तर उद्यां दुसऱ्या, तर परवां तिसऱ्याच ठिकाणीं आश्रय घेतला. सधन लोकांचं दास्यत्व पत्करलं. पर्यायानं त्यांच्या सगळ्या गरजा भागविण्यासाठीं मला तयार व्हावं लागलं...बाळ जन्मल्यानंतर दोन तीन महिन्यांनीं, जीवाला अश-क्तता वाटत असतांही या धंद्याला मी सुरवात केली...तुम्ही पोशाख उतरतां ना? मोकळं वाटेल तुम्हाला मग. मुलगा नाहीं उठत आतां. अन् उठला तरी हरकत नाहीं. ठाऊक आहे त्याला सगळं. भिंतीकडे तोंड करून झोपेल तो! त्याची चोरटी दृष्टि चुकवावी म्हणून कांहीं मी त्याला तसा झोपवीत नसतें तर तोच आपणहून तसा झोपतो...माझ्याकडे फारसं निरखून पाहातां तुम्ही? तुमच्या सौंदर्यदृष्टीला मी कितपत उतरेन याची शंकाच आहे मला! हल्लींच्या नानाविध फॅशन्स मला अज्ञात आहेत. या असल्या कोपऱ्यांत कसे तरी दिवस कंठीत आहें मी—सहसा मी येथून बाहेर जात नसतें...जरा दिवा मोठा करूं का?"

"नको. असंच बरं आहे."

"जग आमच्याकडे पाहून नाक मुरडतं, कुत्सितपणं बोलतं. आहे ठाऊक मला! पण आम्हांला इथं किती त्रास झालाय तें कुणालाच ठाऊक नाहीं. त्यांना वाटतं आमची मजा, चैन चाललेली आहे...हं ही चैन, नाहीं का? खरं आहे. जीवाचा कसा कोंडमारा चाललेला असतो तें आमचं आम्हांलाच ठाऊक! एखादे वेळीं अपरात्रीं एखादा पुरुष घराचं दार ठोठावतो. त्याला रात्रीचं वस्तीला रहायचं असतं आणि आम्हाला गरज असते. आम्ही दार उघडतों. त्या अपरिचिताला आंत घेतों. दार बंद करतों...अन् मग?......कदाचित तो पुरुष सहृदय असतो

किंवा हृदयशून्य. हाडाचा दुष्टही असतो. कुणी सांगावं ! कपाळावर कुणी कांहीं कसलाच शिक्का घेऊन येत नसतो. अशा स्थितींत कितीतरी, कार्लीतासारख्या भोळ्याभावड्या बाया हकनाक फसतात. त्याचं असं झालं....बिचारी ब्राझिलची एक कोवळी पोर होती. त्या पलिकडच्या बोळांत एकटीच रहात होती. एके रात्रीं एक पुरुष वस्तीस तिच्याकडे राहिला. त्यानं मनसोक्त मजा केली व तिनं देह-विक्रय करून मिळवंलेलं धन रातोरात पसार केलं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेव्हां शेजाऱ्यांनीं तिच्या घराचं दार सताड उघडं पाहिलं तेव्हां ते आंतमधें गेले. सगळीकडे शुकशुकाट होता. जिकडे तिकडे माशा घोंघावत होत्या. खोलींत जाऊन पहातात तो पलंगाखालीं रक्ताच्या कुंडांत कार्लिताचा अचेतन नग्न देह भिजत पडला आहे असं भीषण दृश्य त्यांना दिसलं....तुमच्याजवळ सिगारेट आहे का ?"

" मुलाकडे पहा जरा ! "

" नीज हं आर्तुर ! ही मी इथंच आहें. पाहुणे आलेयत ना आमच्याकडे! "

" तहान लागलीय ममा ! "

" थांब हं जरा ! ... पाहिलंत ? मी सांगितलं नव्हतं कीं पाहुणे आल्यावरोबर ताबडतोब दुसऱ्या बाजूला तोंड फिरवून तो झोंपतो म्हणून ? त्याला कळतं आतां......बरं...हें घे पाणी. पी. अन् झोंप हं बाळ ! येतें मी लवकरच. हं ! नीज आतां ! "

" थंडी वाजते ममा."

" हां, ही घे चादर. आतां स्वस्थ नीज......खरंच ! माझं बाळ किनई फारफार चांगलं आहे......आपण अविवाहित आहांत का ? अन् ही आंगठी ? प्रेमसंबंधाची खूण नव्हे का ?...हं!...अस्सं ! तरीच ! मगाशीं मला कशाला खोटं सांगितलंत तर ? आतां हंसतां होय ? तुम्हांला वाटतं, कीं आम्ही आपलीं अगदींच वेडीं माणसं आहोंत ! माझ्याविषयीं तुम्हाला इतका अविश्वास कां बरं वाटला ?...कपडे कां नाहीं काढून ठेवीत तुम्ही ?...अय्या ! काय थंडी झोंबतेय अंगाला ! माझ्या हातांचं कसं अगदीं बर्फ झालंय् ! आपण जायचं ना आतां पलंगावर ?

" तुझा मुलगा जागाच आहे अजून..."

" अंहं ! झोपलाय् तो. त्याचं असं आहे, एकदां का त्याची पाठ अंथरुणाला टेकली म्हणजे तो तत्काळ झोंपेच्या आधीन झालाच म्हणून समजावं... माझ्याकडे विशेषसे निरखून पहातां तुम्ही ! मी आतांशा फारच रोडावलें आहें. आतां दिसतें आहें तशी मी पूर्वी नव्हतें. अतिशय बांधेसूद पुष्ट शरीर होतं माझं. किरकोळ आजार, फाजील कष्ट, रात्रीच्या रात्री जागरणं अन् मानासिक अस्वास्थ्य. पार झिजून गेलं शरीर ...हें दंडाला काय म्हणतां होय ? हं ! आठवण आहे ती एक. वेडेपणा. त्यावेळीं माझ्या कांहीं तरुण सोबतिणींवरोबर रहात होतें मी. एक दिवस एक इसम आमच्याकडे आला अन् स्वखुषीनं आम्हांस गोंदण्यास तयार झाला. सगळ्या सोबतिणींनीं गोंदून घेतलं; मलाही त्यांच्याप्रमाणं गोंवून घ्यावंसं वाटलं. आणि ' सेंट तेरेझा ' ची प्रतिमा दंडावर उठवून घेतली. कांहीं लोकांना असले हे प्रकार फाजीलपणाचे व मूर्खपणाचे वाटतात...बूट नाहीं का काढीत तुम्ही ? माझी खोली अगदींच भिकार नी अव्यवस्थित असल्याबद्दल क्षमा करायची हं ! मुलं असलीं म्हणजे व्हायचंच हें असं...नांव काय आपलं ? "

" जॉन."

" सगळं नांव ? "

" जॉन डी सौजा. "

" खरं ? तुम्हां लोकांना आमच्यासारखींना खरं नांव सांगायची भीति वाटते, कां कुणास ठाऊक! पण तुम्हाला पहातांच माझ्या एका जुन्या ओळखीच्या तरुणाची मला आठवण झाली. सध्या तो जिवंत आहे कीं नाहीं कुणास ठाऊक ! फार चांगला होता तो ! त्याच्या संगतींत मी नेहमींच रहावं म्हणून जें कांहीं करणं शक्य होतं तें त्यानं केलं. पण मी त्याची इच्छा पुरी केली नाहीं. महामूर्खपणा घडला माझ्या हातून तो !...आतां रडून काय उपयोग ?'

" हं, हळू बोल. जागा होईल तो !"

"अय्या ! तुम्हाला त्या अर्भकाची इतकी का भीति वाटते ? "

" भीति नाहीं वाटत. पण......"

" तर मग काय वाटतं ? लाज वाटते होय ? अन् मी ? त्याची जन्मदात्री

आई आहे. खरोखर तुम्हां लोकांची फार गंमत वाटते मला ! या बाबतींत मोठ-मोठ्या माणसांची, साधूंची कांहीं पर्वा करीत नाहीं तुम्ही. अन् त्या इवल्याशा जिवासाठीं कोण सावधगिरी घ्यायची ?...तो फोटो पहातां होय ? माझाच आहे तो ! मी सोळा वर्षांची असतांना एका तरुणाच्या आग्रहावरून तो काढवला होता. पाहिलंत मी त्यावेळीं किती गुबगुबीत होतें ती ? ह्या फोटोंतली स्त्री अन् मी एकच असं सांगूनसुद्धां कुणाला खरं वाटायचं नाहीं. अन् माझे त्या वेळचे केंस ! वेण्या घालून मी ते एकत्र बांधीत होतें. नपेक्षां ते बांधतांच येत नसत. इतका केसाचा विस्तार विपूल होता...तें जग पार, पार नाहींसं झालं...आतां राहिले तें त्याचे भकास, भेसूर अवशेष ! अशी स्थिति होणं मस्करी का आहे ? पण असं असूनही जगायचं आहे म्हणून काळाशीं झगडत, झुंजत टिकाव धरून राहिलेंय् मी अजून-पर्यंत !...हा दुसरा फोटो माझ्या वडिलांचा आहे. बिचाऱ्याचं प्राणापलिकडे प्रेम होतं मजवर. हृदयाच्या विकारानं अचानक त्याचं मरण ओढवलं. लोक म्हणतात कुणी तरी त्यांना दुष्टबुद्धीनं जगांतून नाहींसं केलं. कुणास ठाऊक खरं काय असेल तें...तुम्हाला थंडी नाहीं का वाजत ? बाहेर कसे अगदीं गार गार वारे सुटले आहेत. किती वाजले असतील आतां ? बारा वाजायला आले असतील. शेवटचा शो संपवून सिनेमाला गेलेले लोक परतत आहेत...बाळ झोंपलाय् आतां. त्याबद्दल काळजी नका करूं ! स्...स्...स्... अय्या ? काय थंडी वाजतेय ! तुम्हाला नाहीं का वाजत ?......हो अस्सं !........................................................ काय ?"

" तुझा मुलगा. तुला मी पूर्वीच सांगत नव्हतों कीं तो झोपलेला नाहीं म्हणून ? "

" अं हं ! झोंपलाय् तो. "

" नाहीं. रडतोय् तो ! ऐक. "

" रडतोय् ? ...हो ! खरं आहे...काय हवंय् आतुर ? "

" दुखतंय् ममा. "

" कुठं ? "

" छातींत. फार दुखतंय् ममा. "

" बरं; थांब हं थोडावेळ. बाम चोळतें मग मी! पांघरूण घे तें!"

" मी तुला सांगत नव्हतों, कीं तो जागाच आहे म्हणून?... "

" पण तो इकडे बघायचा नाहीं वळून! आहे त्या स्थितींत आमच्याकडे पाठ करून सगळी रात्र तो तसाच पडून राहील. तुम्ही कांहीं काळजी करूं नका. "

..............................................................................

( आणि तो मुलगा आपल्या हुंदक्यांच्या आवाजानें पाहुण्यांना त्रास होऊं नये म्हणून उशींत तोंड खुपसून अश्रु ढाळतो अन् सुस्कारे टाकतो.)

लेखक–कुपल्यु नॅतु

अनुवादक–त्र्यं. अ. पै रायकर

# सत्य आणि स्वप्न.

आपला नवरा रात्रीचा बराचसा वळ ज्या क्लबमध्यें घालवतो तो असतो तरी कसा हें समजून घेण्याची तीव्र तळमळ मारीय एमीलियाला केव्हांपासून लागली होती. केवळ खेळण्यासाठीं—जुगार खेळण्यासाठीं तो तिथे जात नव्हता हें अगदीं उघड होतें. कारण जुगार खेळण्याचा—साधी मिझेरीकॉर्दिअची लॉटरी घेण्याचा देखील त्याला शोक नव्हता हे तिला चांगलेंच माहीत होतें. मग केवळ दोन घटका आपल्या मित्रांच्या संभाषणसुखाचा आनंद लुटण्यासाठीं तो इतक्या नियमितपणें तिकडे जात असावा का? छे! छे!—मारीय एमीलियाला हेंही कारण पटत नव्हतें. मग त्याला घरीं यायला इतकी रात्र कां बरें व्हावी? स्त्रियांच्या तर्कशास्त्राप्रमाणें यांतून एकच अर्थ निघत होता. आपला नवरा आपल्याला फसवीत आहे असें तिला वाटत होतें. ज्या क्लबांत स्त्रियासुद्धा निस्संकोचपणें जातात, तिथे चाळीस वर्षांच्या आपल्या नवऱ्याचें डोकें बिघडवून टाकणारी एखादी तीस वर्षांची मैत्रीण त्याला भेटणें कांहीं अशक्य नव्हतें.

मनाची कितीही समजूत घातली तरी हा संशय तिच्या मनाला ग्रासून राहिला होता. आणि कितीदा तरी आपल्याला एकदाच क्लबमध्यें घेऊन जाण्याविषयीं तिनें त्याला परोपरीनें विनविलें होतें. पण प्रत्येक वेळीं नवऱ्याकडून तिला ठराविक उत्तर मिळत होतें. दर वेळीं तो म्हणे, " कुलीन स्त्रियांना नेण्यासारखी कांही ती जागा नाहीं."

" मग तुझं तरी काय काम असतं तिकडे?"

" काय हा प्रश्न? पहिलं कारण हें कीं पुरुषांचं असल्या करमणुकीच्या क्लबांत गेल्यामुळं कांहीं बिघडत नाहीं. आणि दुसरं असं, कीं सबंध दिवसाची कामाची दगदग रात्रीं कांही वेळ तरी विसरून जावी अशी माझी इच्छा असते. मन

ताजंतवानं करणारं तें एक औषध असतं. दुसरं कांहीं नाहीं."

मारीय एमीलिय हें ऐकून गप्प बसे. पण ती समजूत पटल्यामुळें नव्हे तर उत्तर न सुचल्यामुळें. आणि खरोखरच तिचा नवरा सर्व दिवसभर खपत असे. सिनेमा, नाटक पाहाण्यास किंवा घटकाभर घरीं स्वस्थ विश्रांति घेण्यास त्याला क्षणभर फुरसत नसे, नी त्याला तें आवडतही नसे. आणि म्हणूनच त्याचें रात्रींचें क्लबांत जाणें त्याच्या दृष्टीनें समर्थनीय होतें. उलट तिला सर्व दिवसभर एकटें राहावें लागे. नवऱ्याचें दर्शन तिला जेवण्याचे वेळीं जें काय होई तेवढेंच. सकाळ होते न होते तों तो बाहेर जाई. रात्रीं फार उशीरां घरीं येई. आणि येई तो सरळ झोंपायला जाई. कपडे काढतां काढतां सदोदित एकच वाक्य उच्चारी. "गळून गेलों आहें अगदीं. झोंपायला जातों हं." आणि नंतर तिचें एक चुंबन घेऊन झोपायला जाई. मग पलंगावर आडवा होई, एका कुशीवर वळे, नी झोंपी जाई.

नेहमीचा ठरलेला कार्यक्रम होता हा.

पण म्हणून मारीय एमीलियाला नवऱ्याबद्दल प्रेम वाटत नव्हतें असें नव्हे. तो तिला आवडत होता हें तर खरेंच, पण आपल्यावरील त्याच्या प्रेमाबद्दल तिला नेहमीं शंका येई व तिचा मत्सर जागृत होई. परंतु आपल्या दृष्टीनें मारीय एमीलिय त्याचा सूड घेत असे. आकर्षक वेषभूषा नी अद्यावत् पद्धतीनें सौंदर्यप्रसाधन करून नवऱ्याची दृष्टि आपल्याकडे वेधून घेण्याचा प्रयत्न करण्यांत तिला सूडाचें समाधान मिळे. आपल्या रेखीव शरीराची काळजी घेण्यांत आणि त्याची मोहकता वाढविणारे निरनिराळ्या रंगांचे झगे निवडण्यांत तिचे तासचे तास जात. ओंठाच्या लालींत दिवसेंदिवस अधिकच भर पडे. आणि पूर्वी महिन्याला पुरणारें काजळ आतां चार दिवसांतच संपून जाई. भुंवयांच्या केसाचें उच्चाटन होऊन त्या ठिकाणीं आतां काळ्या रंगांच्या लांबच लांब अशा धनुष्याकृति रेघा दिसत. आणि मधून मधून ओठांत सिगेरट धरून ती ऐटीनें ओढण्याची संवयही ती स्वतःला लावून घेण्याचा प्रयत्न करी. थोडक्यांत, मारीय एमीलिय या सामान्य स्त्रीतून एक आधुनिक तरुणी हलुहळू निर्माण होत होती. नवऱ्याला जिंकण्याची ही तिची सारी खटपट होती. क्लबमधील तिला अज्ञात असलेल्या नवऱ्याच्या मैत्रिणींचा ती तिरस्कार करी, मत्सर करी, नी अशा उपायांनीं आपलें सौंदर्य वाढवून त्यांच्याशीं स्पर्धा करी. या

स्त्रियांपासून त्याला जो तृप्तीचा आनंद मिळण्याचा संभव आहे त्याची कल्पना करून त्यांच्यासारखीच आपली वर्तणूक ठेवण्याचा ती प्रयत्न करी.

नवऱ्याच्या दृष्टीला जेव्हां हें दिसे तेव्हां तो नुसते खांदे उडवी नी आपल्याशींच हंसे. कशाला हा एवढा खटाटोप? आदाम-ईव्हप्रमाणें परवानगी नसलेलें ज्ञानवृक्षाचें फळ चाखण्याची त्याची वृत्ति होती. नी त्याचें हें ज्ञानवृक्षाचें फळ म्हणजे स्त्रिया-स्वतःची स्त्री खेरीज करून इतर स्त्रिया होत. मारीय एमीलिय ज्या दिवशीं त्याची पत्नी झाली त्याच दिवसापासून तिच्याबद्दल त्याला वाटणारें आकर्षण नष्ट झालें. आणि म्हणूनच तिच्याकडे पूर्ण निर्विकार दृष्टीनें तो पाहात असे. जोंपर्यंत दिवसेंदिवस तिच्या परिणत होत जाणाऱ्या फॅशनच्या शोकानें कुलीनत्वाच्या मर्यादा ओलांडल्या नव्हत्या, तोंपर्यंत तिच्या असल्या थिल्लर कृतींकडे लक्ष देण्याचें कारण आहे असें त्याला वाटत नव्हतें.

असें असलें तरीही त्याच्या कल्पनेप्रमाणें सर्व कांहीं घडत नव्हतें. मारीय एमीलिय आपल्या नवऱ्याशीं एकनिष्ठ होती ही गोष्ट खरी. आणि तिच्या विवाहपूर्व आयुष्यांत जरी तिनें शेंकडों पुरुषांवर अव्यक्त प्रेम केलें होतें, तरी कुमारावस्थेंतलि या काल्पनिक प्रणयाच्या आठवणींमुळें तिच्या वैवाहिक जीवनसंगीतांत केव्हांही विसंवादित्व उत्पन्न झालें नव्हतें. परंतु कांहीं स्त्रियांच्या बाबतींत वैवाहिक एकनिष्ठता ही स्वाभाविक नसून कृत्रिम असते. तिचें मूळ मनःप्रवृत्तींत नसून सदिच्छेच्या पोटीं सांपडतें. मारीय एमीलिय ही या प्रकारच्या स्त्रियांपैकीं एक होती. तिची वृत्ति स्वयंकेंद्रित होती. केवळ तिच्या मनावर झालेले संस्कार नी तिनें वारंवार केलेले प्रयत्न यांच्या जोरावर तिची सदिच्छा तिच्या मनःप्रवृत्तीवर विजय मिळवीत असे.

दिसायला मारीय एमीलिय ही एक सुंदर तरुणी होती. रंगानें सांवळी, डोळे विशाल, काळेभोर, रसरशीत नी आनंदी. चालतांना तिच्या रेखीव देहांत संगीतांतील स्वरसंगतीचा भास होई. आणि तिच्या ओठांवर खेळत असलेल्या विलोभनीय स्मितांतून तिच्या हृदयांत नी रक्तांत नाचत असलेला जीवनाचा आनंद-जीवनाची आकांक्षा परावर्तित होई.

मारीय एमीलियाची ही वृत्ति नवऱ्याच्या कांहीं मित्रांच्या माहितीची होती.

तिच्या स्वभावांतील या दुर्बलतेचा फायदा घेण्याची इच्छा त्यांच्यापैकीं पुष्कळांना होती. परंतु त्यांना तशी संधि कधीं मिळाली नव्हती. कारण मारीय एमीलियानें घराच्या चार भिंतींच्या आंत स्वत:ला कोंडून घेतलें होतें. तिच्या मनांत आंत आंत कुठें तरी आपल्या प्रमत्त तारुण्याचें शमन करण्याची नी जीवनांतील विविध सुखोपभोगांचा उन्मादक अनुभव घेण्याची लालसा सुप्तपणें वसत होती.

इतक्यांत कार्निवालचा सण जवळ आला. सणाला चार दिवस असतांना मारीय एमीलिय नवऱ्याला म्हणाली,

"या खेपेला मात्र मी तुझ्याबरोबर येणार हं ! नेणार ना मला ?"

"नाहीं."

"मी बुरखा घेऊन येईन. म्हणजे कुणी ओळखणार नाहीं मला. मग तर झालं ना ?"

कांहीं मिनिटें विचार करून मारियु म्हणाला,

"कदाचित् नेईन. पण आपण मागाहून विचार करूं सावकाश या गोष्टीचा."

नवऱ्याच्या या संदिग्ध उत्तरानें का होईना पण तिचें समाधान झालें. वेळ न दवडतां कुणाला न कळत तिनें शिंप्याला बोलावणें पाठवलें, नी क्लबांत जाण्याच्या वेळीं घालण्यासाठीं एका खास झग्याची ऑर्डर दिली. तिला आतां उन्माद चढला होता. आपण मारीय एमीलिय नसून आपल्या कायेंत दुसरी कोणती तरी स्त्री वास करीत आहे असें तिला वाटूं लागलें. तिचे मनोविकार आतां उचंबळून आले होते. जीवनाचा आनंद लुटण्याची ही संधि दवडूं नकोस असें तिचें मन तिला सारखें सांगूं लागलें. तिच्या भावना उद्दीपित झाल्या. वासना बळावूं लागल्या. परंतु वासनांच्या या कल्लोळांत तिची बुद्धि मात्र अजूनही शाबूत होती. कार्निवालच्या रात्रीं स्वस्थपणें घरींच राहाण्याचा सल्ला ती तिला ओरडून देत होती. आणि म्हणून या अपवादात्मक अननुभूत प्रसंगाचा फायदा कोणत्याही प्रकारचें अनाचाराचें, चवचालपणाचें किंबहुना साधें चावटपणाचें कृत्य करण्यांत घ्यावा असा तिचा हेतु नव्हता. ज्या वातावरणापासून नवऱ्यानें आपल्याला जाणून बुजून दूर ठेवलें होतें, तें वातावरण समजून घ्यावें, नी त्याला आवडणाऱ्या या स्त्रिया असतात तरी कशा हें जवळून पाहून घ्यावें, एवढाच तिचा क्लबाला भेट देण्याचा उद्देश होता. दिसेल

त्या उपायानें नवऱ्याला खुष करावें नी त्याच्या प्रीतीचा ओघ पुन्हा आपल्याकडे वळवून घ्यावा, अशी तिची इच्छा होती. व या इच्छेला मूर्त स्वरूप आणण्यास आपल्याला नाचाला नेऊन नवरा अप्रत्यक्षपणें मदत करील अशी तिची खात्री होती.

कार्निवालचा दिवस उजाडला. संध्याकाळ होत आली. तिनें नाचाला जाण्याची सर्व तयारी केली.

पण मारियुनें आज आपला विचार बदलला होता. तिला क्लबांत नेण्यास तो तयार नव्हता.

मारीय एमिलिय रडली, कुढली, रागावली, जाजावली. पण तिला नेहमीचेंच उत्तर मिळालें.

"तुला नेण्यासारखी ती जागा नाहीं."

नवऱ्याच्या गळ्याला तिनें मिठी घातली. आणि त्याच्या शरीराला विळखा घालून त्याचीं आवेगानें चुंबनांवर चुंबनें घेतलीं. जणुं या प्रेमोपचारांच्या द्वारें आपल्याला नेण्याबद्दल ती त्याला विनवीत होती. मग तिला एकदम रडूं आलें. ती रडत रडतच म्हणाली,

"एकदाच... फक्त एकदाच! काय बिघडणार आहे मी आलें तर? ने ना मला...ने ना?"

मारियुनें तिला दंडाला धरून उभें केलें नी तिच्या अश्रुपूर्ण नेत्रांचें एक चुंबन घतलें.

"वेडी आहेस तूं माझ्या पोरी! कुलीन स्त्रियांनीं जाण्यासारखी ती जागा नाहीं हें मी तुला सांगितलं आहे ना? मग कां बरं मला गळ घालतेस? पुन्हां विचार सुद्धां करूं नकोस तिथं जाण्याचा."

मारीय एमीलियानें त्याच्या हातांतील दंड सोडवून घेतले. पण तेवढ्यांत तिच्या डोळ्यांत अश्रूंनीं अधिकच गर्दी केली.

आपल्या नकारानें तिच्या हृदयास अत्यंत तीव्र वेदना होत असल्याचें त्याच्या लक्षांत आलें. आणि तिला पूर्ववत् आनंदी करण्याच्या हेतूनें त्यानें तिचें मस्तक आपल्या दोन्ही हातांत घेतलें आणि तिच्या ओठांचें एक लांब लांब चुंबन घेतलें.

मारीय एमीलियानें कोणताच प्रतिकार केला नाहीं. आणि नाचाला जाण्याची गोष्टही तिनें नंतर काढली नाहीं.

* * *

साधारण मध्यरात्रीं एका मैत्रिणीबरोबर क्लबमधील नाचाच्या दिवाणखान्यांत प्रवेश करतांना मारीय एमीलिय आश्चर्यानें स्तिमित झाली होती. इतक्या मोठ्या, अनोळखी नी गोंधळाच्या लोकसमुदायांत मिसळण्याचा तिचा हा पहिलाच प्रसंग होता. नृत्याच्या दिवाणखान्यांतलें तें नेत्रदीपक वातावरण तिला सर्वस्वी नवीन होतें. तोंडावर बुरखा घेऊन हिंडणाऱ्या स्त्रियांप्रमाणेंच बुरखा नसलेल्या स्त्रियाही तिला अज्ञात होत्या. या इतक्या स्त्रियांपैकीं मारियुचा कोणाशीं बरें संबंध असावा? आणि कोणत्या वैशिष्ट्यामुळें तो तिच्यावर आषक्त झाला असावा? तिला पाहाण्याची, तिला भेटण्याची, तिचें निरीक्षण करण्याची उत्कट इच्छा मारीय एमीलियाला झाली होती. ती गोरी असेल कीं सांवळी असेल? पोरसवदा असेल कीं तरुण असेल? एकदा तिला पाहाण्याची काय ती खोटी; सौंदर्यात, मोहकतेंत, कपड्यांच्या आवडीनिवडींत तिला आपण मुळींच हार जाणार नाहीं याची तिला खात्री होती....मारीय एमीलियाचे स्वतःशींच असे विचार चालले होते. इतक्यांत एक अनोळखी पुरुष तिच्या जवळ आला, नी आपल्याबरोबर नाचण्याची त्यानें तिला विनंति केली.

अवगुंठित असल्यामुळें त्याचा चेहरा तिला दिसूं शकला नाहीं. आणि गोंगाटामुळें त्याचे शब्द तिला ऐकूं आले नाहींत. परंतु त्याचें म्हणणें तिला समजलें. प्रथम ती गोंधळली. त्याला नकार द्यावा असें तिच्या मनांत आलें. पण काय घडतें आहे याची जाणीव होण्यापूर्वीच त्यानें तिला उभें केलें नी वाद्यांच्या तालांत त्यांच्या पायांना गति मिळाली.

तिची मैत्रीण तर गर्दीत केव्हांच मिसळून गेली होती नी तिला बाहूंत घेणाऱ्या पहिल्याच पुरुषाबरोबर ती एव्हांना नाचूंही लागली होती.

त्या उन्मादक वातावरणांत मारीय एमीलियाच्या हृदयांतील विकारांचा सैतान जागृत झाला. दिवाणखान्यांतल्या खिडक्या जरी सताड उघड्या होत्या

तरी आंत अतिशय उकडत होतें. जीविताचा पुरेपूर उपभोग घेण्याच्या आनंदानें प्रत्येकाचें हृदय उचंबळून आलें होतें. सर्वजण खात होते, पीत होते, नाचत होते, बागडत होते, नी शक्य त्या तऱ्हेनें जीवाची करमणूक करून घेत होते. दिवाणखान्यांतलें वातावरण सूक्ष्म, अदृश्य धूलिकणांनीं भरून गेलें होतें. त्यांतच मादक दारूचा उग्र दर्प आणि स्त्री-पुरुषांनी वापरलेल्या अत्तराचा सुगंध मिसळून गेला होता. सिगारेटच्या नी झुंबरांतील मेणबत्त्यांच्या धुरांचीं दाट वलयें छताला जाऊन भिडत होतीं. दोन ऑर्केस्ट्रांतून आलटून पालटून आफ्रिकन नीग्रोंच्या संगीताचे उन्मादक स्वर निघत होते. विविध आवाजांच्या ध्वनिलहरी एकमेकांवर आदळून एक प्रकारचें नादयुक्त, लयबद्ध वातावरण निर्माण झालें होतें. आणि त्यांतच स्त्री-पुरुषांच्या संभाषणांचा आवाज विलीन होत होता. दिवाणखान्यांतली वाढती उष्णता, शांपेनचा दर्प, अत्तराचा घमघमाट, सर्व कांहीं मारीय एमीलियाला मोह पाडीत होतें. प्रेक्षक म्हणून दूर राहून या अननुभूत घटनेचा अनुभव घ्यावा असा तिचा विचार होता. पण हळुहळू तिची ही प्रेक्षकाची भूमिका नष्ट होत होती नी एक घटक म्हणून नृत्याच्या या कार्यक्रमांत ती सामील होत होती.

मारीय एमीलियाचें शरीर त्या अनोळखी पुरुषाच्या शरीराला भिडलें होतें. त्याचे हात तिच्या पुष्ट अवयवांवरून फिरत होते. त्याचे पाय तिला आपल्यामागून नेत होते. पुन्हा पुन्हा तिच्या शरीराचा स्पर्श इतर स्त्रियांच्या शरीराला होत होता. या स्त्रियांचीं शरीरें श्रमित झालीं होतीं, गात्रें गलित झालीं होतीं. पण त्यांचे डोळे उल्हासानें चमकत होते.

मारीय एमीलिय आपल्या जोडीदाराशीं बोलण्याचें टाळीत होती. आपण बोललें तर आपला आवाज कुणी ओळखणार तर नाहींना अशी भीति तिला वाटत होती. होकार किंवा नकार फक्त मानेच्या हालचालींनीं ती दर्शवीत होती. तिच्या देहाला नी मनाला एखादें उत्तेजक पेय घेतल्याप्रमाणें उन्मादाची तंद्री आली होती. कसली तरी अननुभूत, गोड, तरल भावना तिच्या शिराशिरांतून सळसळत होती. आणि एका नव्या अनुभूतीचा आनंद ती उपभोगीत होती.

थोड्याच वेळांत ज्या हेतूनें तिनें नाचाला येण्याचें साहस केलें होतें, तो हेतु ती विसरून गेली.

तिच्या जोडीदारानें नाचतां नाचतां तिला आपल्या बाहुपाशांत अधिक जोरानें आवळून धरलें. त्या अपरिचित पुरुषाची तिला भीति वाटली. पण ती क्षणभरच. आपण अगतिक होत आहों, आपल्या मनावरील ताबा सुटत चालला आहे असें तिला वाटूं लागलें. आपलें सर्वस्व अर्पण करायचा क्षण जवळ येत चालला आहे अशी क्षीण कल्पना विद्युद्वेगानें तिच्या मनाला चाटून गेली.

तिच्या मनांत चाललेल्या या विचारांची नी तिच्या भावनांची कल्पना तिच्या जोडीदाराला मुळींच नव्हती. आपल्या बाहुपाशांत असलेल्या स्त्रीचें नांव मारीय एमीलिय असून नवऱ्याच्या इच्छेविरुद्ध ती इथें आलेली आहे हें समजणें त्याला शक्यच नव्हतें—आणि म्हणूनच तिच्या तोंडावरील बुरखा काढून टाकण्याबद्दल तो तिला नाना तऱ्हांनी सुचवीत होता, तरी ती फक्त हंसून नकार दर्शवीत होती.

त्याला शेवटीं कळून चुकलें कीं जिच्याबरोबर आपण नृत्य करीत आहों, ती एक कुलीन स्त्री आहे. आणि मग त्यानें आपला आग्रह सोडून दिला. आपल्या मिठींत असलेल्या तप्त नी गोंडस स्त्रीदेहाच्या संगतीचा आनंद तिचा चेहरा पाहिल्यामुळें किंवा तिचें नांव समजल्यामुळें होणाऱ्या आनंदापेक्षां खचित जास्त आहे असें त्याला वाटलें. आणि तिचें नांवगांव समजून घेतल्याशिवायच शेजारच्या एका खोलींत तो तिला घेऊन गेला.

त्यानें शांपेनची ऑर्डर दिली. घसा व ओंठ जळजळेपर्यंत पण मोठ्या समाधानानें तिनें शांपेन घेतली.

दोघांच्याही वृत्ति आतां अधिकच उत्तेजित झाल्या. त्या छोट्या खोलींत आतां दुसरें कुणीही नव्हतें. त्यानें तिला आपल्या हृदयाशीं अधिकच जोरानें आंवळून धरलें. तिच्या कानांत घोगऱ्या आवाजांत कांहीं गूढ वाक्यें तो बोलूं लागला. मिटल्या डोळ्यांनीं नी थरथरत्या ओठांनीं ती ऐकूं लागली. तिच्या खांद्याचें चुंबन घेतांच तिचें देहभान हरपलें. तिचा भूतकाळ आतां नष्ट झाला होता. भविष्यकाळ राहिला नव्हता. स्वतःला नी जगाला ती विसरून गेली होती.

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मारियु अजून अंथरुणांत पडून होता. पत्नीच्या

कालच्या साहसाची त्याला मुळींच कल्पना नव्हती.

मारीय एमीलियाची तंद्री अजून उतरली नव्हती. आतांही त्याच गंधर्वनगरींत ती भ्रमण करीत होती. ज्या अज्ञात पुरुषाबरोबर तिनें कांही मिनिटें प्रणयाचे खेळ खेळले होते, तिच्या नैसर्गिक विलासप्रिय वृत्ती त्या उन्मादक वातावरणांत आसुसल्या असतांना ज्यानें त्यांचें शमन केलें होतें, त्या पुरुषाची स्मृति तिच्या अगदीं आंतल्या मनांत तरळत होती.

मारियु आपल्या अगदीं जवळ वावरणाऱ्या पत्नीचें अस्तित्व विसरण्याचा प्रयत्न करीत होता. आणि काल रात्रीं सत्यसृष्टींत जें क्षणाचें जीवन तो जगला होता, त्याची दीर्घ अनुभूति स्वप्नांतून घेत होता. ज्या अवगुंठित स्त्रीनें आपलें यौवन, आपलें सर्वस्व त्याला अर्पण केलें होतें ती स्त्री आतांही आपल्या शेजारीं असून आपल्याशीं प्रणयाचे चाळे करीत आहे अशी गोड कल्पना करून तो स्वप्नसृष्टींत विहार करीत होता.

परंतु आज प्रत्यक्षाकडे दुर्लक्ष करून स्वप्नाच्या यक्षलोकांत प्रवेश करूं पाहाणारीं हीं पति-पत्नी म्हणजेच काल नृत्याच्या दिवाणखान्यांत क्षणकाल एकत्र येऊन जीविताचा आनंद लुटणारें प्रणयी युगुल होतें याचा त्या दोघांनाही पत्ता नव्हता.

दोघेंही स्वप्न जगत होतीं नी सत्य विसरत होती.

लेखक—आन्गूश्तु द कॉश्त.
अनुवादक—बा. द. सातोस्कर.

# कुरळे केस

दुपारीं तीन वाजतां डॉ. सील्व्ह नुकतीच कुठें जेवण्यास सुरवात करतात न करतात, तोंच टेलिफोनची घंटा खणखणली. पण पत्नी नी तीन मुलें यांच्या गराड्यांत जेवायला बसलेल्या डाक्टरांना पॅरिसहून नुकत्याच आणलेल्या आचाऱ्याच्या हातच्या सुग्रास अन्नाचा स्वाद घेण्याचें काम शांतपणें चालू केलें.

"सिंजोरा कोंदेस दुश आंजुशचा फोन आहे साहेब. त्या आपल्याशीं बोलूं इच्छितात." सफेत कपडे केलेल्या एका निग्रो नोकरानें आंत येऊन डॉक्टरांपासून पांच पावलें दूर उभें राहून अदबीनें सांगितलें व उत्तराची वाट पहात तो तेथेंच थांबला.

डॉ. सील्व्ह जरा बेचैन झाले. नोकराला काय उत्तर द्यावें याचा त्यांना विचार पडला. कोंदेसना टेलिफोनशीं तिष्ठत ठेवणें त्यांच्या जिवावर आलें. पण अर्ध्या जेवणावरून उठून जाणेंही त्यांना तितकेंच दुःखदायक झालें.

"त्यांना सांग कीं मी एका पेशंटच्या पायावर उपचार करण्यांत गुंतलों आहें. त्यामुळं मी फोन घेऊं शकत नाहीं. मला फार फार वाईट वाटत आहे म्हणावं त्याबद्दल."

दरबारी पद्धतीचा सलाम ठोकून नोकर निघून गेला. मिसेस सील्व्हच्या चेहऱ्यावर क्षणार्ध मत्सराचा भाव उमटला. पण तितक्यांत सावरून घेत तिनें निर्विकार चेहऱ्यानें म्हटलें,

"ही सिंजोरा कोंदेस आपला अगदीं पिच्छा पुरवीत आहे. खात्रीनं ती कांहीं म्हातारी नसावी."

आणि कोंदेस दुश आंजुश म्हातारी नव्हती हें खरें होतें. ती वयानें म्हातारी नव्हती तशी पदवीनेंही नव्हती. तिचें वय पस्तिशीच्या आंत होतें

आणि 'कोंदेस (काउंटेस)' ही पदवी तर ती नुकतीच—१९३० सालापासून आपल्या नांवामागें लावीत होती. याच सालीं तिच्या नवऱ्याला जुआंव दुश आंजुश यांना उदारमतवादी असूनही पोपसाहेबांकडून 'कॉंदि' ही पदवी मिळाली होती. जुआंव दुश आंजुश हे कॉंदि तर होतेच, पण शिवाय शहरांतील ते बडे व्यापारी होते. आणि ह्या दोन गोष्टी त्यांना नी त्यांच्या पत्नीला—कोंदेस येव्लालिय दुश सांतुश आंजुश यांना मोठेपणा मिरवायला पुरेशा होत्या.

"पण तुला कां या चौकशा? ती म्हातारी असेल किंवा नसेलही!" डॉ. सील्व्हांनी रुक्षपणें म्हटलें, "तूं ज्यावेळीं गॉडफ्रॉयमध्यें Manicure होतीस त्यावेळीं मी तुझ्या गिऱ्हाइकांच्या वयाची कुठं चौकशी करत होतों? तुझ्याबद्दल किती तरी प्रवाद त्या वेळीं माझ्या कानावर येत होते! तुझ्या व्यवसायांत असे प्रवाद निर्माण करण्यासारखे कांहीं धोके आहेत. याची मला जाणीव होती. माझ्याही व्यवसायांत कांहीं धोके आहेत आणि अशा धनवान पेशंटांच्या बाबतींत ते विशेष आहेत ही साधी गोष्ट तुला कां समजूं नये?"

तो नीग्रो नोकर टेलिफोनवरून निरोप घेऊन पुन्हां आंत आल्यामुळें पतिपत्नींमधील विकोपाला जाणारें हें भांडण तेथेंच थांबलें.

"सिंजोरा कोंदेसना आपली ताबडतोब गरज आहे असं त्यांचं म्हणणं आहे. सवड होतांच बोलावलं आहे त्यांनीं."

"हो येईन, येईन. अर्ध्या तासाच्या आंत येईन म्हणावं त्यांना." डॉ. सील्व्ह अर्धवट चिडून म्हणाले. आणि मग ओठांतल्या ओठांत पुटपुटले,

"मूर्ख शिंची कुठली!"

डॉ. सील्व्ह मधून मधून असली ग्राम्य भाषा वापरीत. आपल्या गांवढळ पूर्वजांचा हा वारसा नी शोकीन मित्रमंडळाच्या सहवासांत केलेली ही कमाई होती. असें असलें तरी त्यांची अभिरुचि उच्च दर्जाची होती. त्यांचा दवाखाना उत्कृष्ट अशा आधुनिक उपकरणांनी युक्त नी उंची फर्नीचरनें शृंगारलेला होता. तरी पण त्यांच्या पेशंट्स् (डॉ. सील्व्ह स्त्रीरोगतज्ञ असल्यामुळें त्यांच्या पेशंट्स् सर्व स्त्रियाच असत.) त्यांच्या दवाखान्याची पायरी क्वचितच चढत. आपल्या घरींच त्यांना आपली प्रकृति दाखविण्याचा शहाणपणाचा मार्ग त्या स्वीकारीत. स्वतः डॉ. सील्व्ह

या आपल्या गिऱ्हाइकांवर फार खुष होते. त्यांच्या जीवावर सुखासमाधानानें किंबहुना ऐषआरामानें त्यांना राहातां येत होतें, आणि म्हातारपणासाठीं कांहीं शिल्लकही टाकतां येत होती. कोंदेस दुश आंजुश ही त्यांची एक श्रीमंत पेशंट होती. आणि अशा पेशंटच्याबद्दल अनास्था दाखविणें त्यांना शक्य नव्हतें. पण पत्नीच्या मनांत भलत्याच संशयाचीं बीजें पेरलीं जाऊं नयेत म्हणून कोंदेसबद्दल थोडीशी बेपर्वाई त्यांना दाखवावी लागली.

* * *

आणि थोड्याच वेळानें संध्याकाळीं ५ वाजतां आपल्या कोऱ्या करकरीत नी भपकेदार रोलसरॉइसमधून उतरून कोंदेस दुश आंजुशच्या बंगल्याच्या दारावर टकटक करीत डॉ. सील्व्ह उभे होते. कॅनरी पक्ष्याप्रमाणें पिवळ्या रंगाचे हातमोजे, राखी रंगाचा सूट, त्याच रंगाची हॅट,—हें सर्व डॉ. सील्व्ह यांनीं पॅरिसमधल्या फॅशनसाठीं प्रसिद्ध असलेल्या दुकानांत घेतलें होतें.—डिग्री घेतल्यावर दर वर्षी एकदा तरी पॅरिसमधील आपल्या ओळखी दृढ करण्यासाठीं डॉ. सील्व्ह पॅरिसला जात असत.—दोन बोटांमध्यें एक लठ्ठ चिरूट, कोंदेसच्या आजाराला जरूर लागणारीं गुंतागुंतीचीं शास्त्रीय उपकरणें असलेली रशियन चामड्याची एक बॅग—

डॉ. सील्व्हांना फार वेळ वाट पाहावी लागली नाहीं. एका नोकरानें येऊन दार उघडलें आणि त्यांनीं घरांत प्रवेश केला.

कोंदेस दुश आंजुशच्या खाजगी खोलीच्या दाराशीं येतांच कोंदेसची एक खास नोकर डॉक्टरसाहेबांना शोधीत आली.

“ वेळेवर आलांत, डॉक्टरसाहेब ! सिंजोरा कोंदेस फार अस्वस्थ झाल्या आहेत.”

“ अगदीं ताबडतोब आलं पाहिजे होतं का ? ” हातमोजे काढीत व चांदीच्या रक्षापात्रांत चिरूट विझवीत डॉ. सील्व्हांनीं विचारलें.

“ होय, असं वाटतं खरं, डॉक्टरसाहेब. सिंजोरा कोंदेस नर्व्हस व्हायला लागल्या होत्या.”

“ आंतून घंटेचा आवाज आला.

" चलावं, डॉक्टरसाहेब." कोंदेसच्या खास दासीनें घंटेचा अर्थ स्पष्ट केला.

शांत नी निर्भय पावलानें डॉ. सील्व्हांनीं कोंदेसच्या अंतर्गृहांत प्रवेश करून टॉयलेटरूममध्यें मोर्चा वळविला. कोंदेस दुश आंजुश टॉयलेटचीं कांचपात्रें नी अत्तराच्या कुप्या यांनीं भरलेल्या सुगंधित टॉयलेट टेबलपुढें उभी होती. तिचें वेष नी केसप्रसाधन नुकतेंच आटोपलें होतें. काळा जरीचा पिजामा तिनें परिधान केला होता. उलव्या वळवलेल्या केंसांवरून शेवटची फणी नुकतीच फिरविली होती. आणि क्वचित् कुठें सुरकुती दिसूं लागलेल्या चेहऱ्यावरून पावडरचें फूल ती फिरवीत होती. डॉ. सील्व्हांनीं पुढें येऊन कोंदेसला मान वांकवून अभिवादन केलें, नी तिच्या हाताचें चुंबन घेतलें. कोंदेसची खासगी दासी निघून गेली. आणि बाहेरून दार बंद झाल्याचा आवाज आला.

खोलींत आतां एकांत मिळाल्याचें पाहून कोंदेस झटकन् उठली नी तिनें डॉ. सील्व्हांच्या गळ्यांत हात घातले, आवेगभरानें त्यांचें एक चुंबन घेतलें, आणि त्यांचे दोन्ही खांदे पकडीत मोहक हास्य करीत म्हटलें,

" आज कीं नाहीं, आन्हेनीद पालासमध्यें मोठा नाच व्हायचा आहे. मग माझे केस नको का कुरळे करायला ? पेटी आपली आहेस ना बरोबर ?"

" आणि डॉ. सील्व्ह कोंदेसचे केंस कुरळे करायचें सामान बॅगमधून काढून व्यवस्थित लावीत असलेले पाहून ती पुढें म्हणाली,

" आणि तुला पण नेणार आहें हं बरोबर ! माझा नवरा कांहीं येऊं शकत नाहीं आज. त्याला काम आहे म्हणे रात्रीं. बरोबर अकरा वाजतां यायचं हं, माझ्या लाडक्या ! माझ्या प्रतिस्पर्ध्यांना कळून आलं पाहिजे कीं माझ्या केंसाचा प्रसाधक हा माझ्या हृदयाचा सुद्धा स्वामी आहे."

लेखक—आग्यूश्तु द कोंश्त
अनुवादक—बा. द. सातोस्कर

# इ. स. २००० सालीं—

सां निकोलाव रस्ता व ओव्ह रस्ता यांच्या नाक्यावरील उंच खांबावर उभा असलेल्या पोलीसनें खूण केली, आणि दोन सेकंदभर थांबलेल्या मोटारींच्या लांबच लांब रांगा पुन्हा हालूं लागल्या. आपल्याच तंद्रीत चालणाऱ्या हुगोच्या कांहीं हें लक्षांत आलें नाहीं. तो रस्ता ओलांडण्यासाठीं पुढें येण्यास आणि पहिल्या मोटारीनें वेग घेण्यास एकच गांठ पडली. अपघात होणार हें ड्रायव्हरच्या लक्षांत आलें आणि बेगुमानपणें रस्त्यांतून चालणाऱ्या आणि मोटारींचें जीवित भयंकर धोक्यांत आणणाऱ्या पादचाऱ्यांना मोठमोठ्यानें शिव्या देत चारही चाकांना त्यानें ब्रेक लावले. चारही रांगांतील मोटारी क्षणभर थांबल्या. (प्रत्येक शहरवासीयाजवळ मोटार असल्यानें शहरांत ट्रॅमचा अभाव होता, आणि फुटपाथही नव्हते.) आणि हुगोच्या अंगावर ओरडणाऱ्या ड्रायव्हरला इतर ड्रायव्हरांनीं दुजोरा दिला, नी तेही तारस्वरांत ओरडूं लागले,

"चालण्यासाठीं कांहीं रस्ते केलेले नाहींत!"

"आणि इतक्यासाठीं का सरकारला आम्ही कर देतों!"

"त्याला सिव्हिल गव्हर्न्मेंटमध्यें (पोलिसांत) दिलं पाहिजे."

"या अपघातांत माझी मोटार सांपडली असती तर सर्वनाश झाला असता!"

या आरड्याओरड्यांत स्वतःचें समर्थन कसें करावें हें त्याला समजत नव्हतें. खरेंच, मोटारींची रीघ लागलेला शहरांतील एक हमरस्ता ओलांडून जाण्याचें मूर्ख साहस आपण करायला नको होतें असें त्याला वाटूं लागलें. परंतु आतां त्याचा पश्चात्ताप करून काय उपयोग? 'अपघातां'त सांपडलेल्या मोटारीच्या ड्रायव्हरबरोबर सिव्हील गव्हर्न्मेंटमध्यें जाऊन तो सांगेल ती नुकसानभरपाई देणें

आणि पोलिसच्या खुणांकडे लक्ष न देऊन रस्त्याचा कायदा मोडल्याबद्दल दंड भरणें, ( प्रत्येक नागरिकानें रस्त्याचा कायदा जवळ बाळगावा असा कायदा होता, आणि त्याप्रमाणें आतांसुद्धां तो हुगोच्या खिशांत होता. ) आतां त्याला भाग होतें. आणि त्याच्या खिशांत तर दिडकी नव्हती.

...पण इतक्यांत या संकटप्रसंगीं एका सुंदर तरुणीच्या रूपानें त्याचें दैव धांवून आलें. दुसऱ्या रांगेंतील एका मोटारीचें दार उघडून अठरा वर्षांची, तोंडांत सिगारेट धरलेली एक मोहक, सुंदर, उमदी तरुणी धिम्या पावलांनी तिथें आली नी ड्रायव्हरला म्हणाली,

" हें पहा, यांची सर्व जबाबदारी मी घेतें. अधिक उणं बोलायची कांही जरूर नाहीं. सध्यां हा चेक तुम्ही घेऊन जा." इतकें म्हणून स्टेट बँक मध्यें ( Banco do Estado–बांकु दु इश्तादु हें पूर्वीच्या बांकु द पोर्तुगालचें बदललेलें स्वरूप होतें. ) असलेल्या आपल्या खात्यावर तिनें एक चेक लिहिला, नी तो टरकन् फाडून 'अपघातां'त सांपडलेल्या ड्रायव्हरच्या हवालीं केला. नी मग हुगोकडे वळून ती म्हणाली, " चला. माझ्या गाडीत जाऊन बसा. माझ्याबरोबर नेणार आहें मी तुम्हांला."

अर्धवट सिव्हिल गव्हर्न्मेंटमध्यें जाण्याचें टळल्याच्या समाधानानें, नी अर्धवट त्या अपरिचित तरुणीच्या सौंदर्यानें व कृतीनें दिपून जाऊन हुगो मुकाट्यानें जाऊन गाडींत बसला.

" ऐन वेळीं झालेल्या आपल्या मदतीबद्दल फार फार आभारी आहें मी आपला. " गाडी सुरू झाल्यावर भीत भीत त्यानें म्हटलें.

" त्यांत आभार मानण्यासारखं काय आहे ? आपल्याविषयीं वाटणारी सहानुभूति तेवढी व्यक्त केली मी. "

हुगो लाजला. आतांपर्यंतच्या त्याच्या आयुष्यांत त्यानें इतका भावनात्मक प्रसंग अनुभवला नव्हता. पुष्कळ वेळा सातवा एडवर्ड पार्कमध्यें ( सबंध शहरांत मोकळेपणें पायांनीं फिरतां येण्याजोगी ही एकच जागा होती. ) कितीतरी तरुण पोरींनी नी विवाहित स्त्रियांनीं त्याचें प्रियाराधन केलें होतें. परंतु आजच्या या तरुणीइतकी मोहक नी सुंदर स्त्री त्याला आढळली नव्हती. आणि गाडींत तिच्या

शेजारीं बसला असतांना तिच्यासारख्या एखाद्या सुंदर व श्रीमंत तरुणीशीं आपला विवाह झाल्यास आपण किती सुखी होऊं याचा तो विचार करीत होता.

" आपलं नांव समजेल का मला ? " तिनें विचारलें.

" हुगो. "

" माझं नांव व्हेर्द. माझे वडील बँकर आहेत. नी मी इंजीनियर आहें. तेन्रेय्रु दु पासु येथें चालू असलेल्या एका सरकारी बांधकामावर देखरेख करण्यासाठी मी आतां चाललें आहें. आणि तुम्ही काय करतां ? "

पुरुषसुलभ लज्जेच्या व भीतीच्या भावनेनें त्याचे डोळे खालीं वळले. त्याचा चेहरा गोरामोरा झाला.

" ग्रांदॅल या स्टुडियोंत मी मॉडेल आहें...माझे वडील स्त्रियांच्या टोप्या बनवतात...नी माझ्या आईचं पुरुषांचे कपडे शिवायचं दुकान आहे. "

" असं असून तूं सुखी आहेस का ? नाहींस ना ? ठीक आहे. मी तुला मदत करतें. तुझं लग्न झालेलं नाहींना ? ठीक, ठीक...कुठं जात होतास तूं आतां ?"

" मी आतां मसाजिस्टकडे जात होतों. "

शरीराचें वजन वाढू नये नी त्याचा रेखींवपणा कमी होऊं नये म्हणून हुगोला मधून मधून शरीराला मालीश करून घेणें भाग पडे.

" मग माझ्या गाडींतूनच नेऊन सोडतें मी तुला तिथं. " व्हेर्द म्हणाली.

तिची मोटार धांवत होती. नी तिचे हात चाकावर स्थिर होते. ओव्रु रस्त्यावरून मोटार आतां आव्गूश्तु रस्ता चढूं लागली. नंतर ती फ्रांकेय्रु रस्त्याला वळली. पुन्हा प्रात रस्त्यावरून धांवूं लागली. रॉसियु चौकांत शिरली. न कार्मु रस्ता चढूं लागली. शियादु चौकांतल्या कामोंइशच्या पुतळ्याला प्रदक्षिणा घालून आल्मादु रस्ता उतरूं लागली. शेवटीं सां फ्रांसिश्कु रस्ता चढली आणि ग्रंथालयापाशीं असलेल्या मसाजिस्टच्या दारांत येऊन थांबली.

" आतां संध्याकाळीं सात वाजतां भेट हं ! चालेल ना ? " तिनें विचारलें.

" हो चालेल."

" माझ्या सहवासाची भीति वाटत नाहीं ना तुला ? "

हुगोनें स्मित केलें. त्याचे डोळे आनंदानें चमकले नी ते अधिकच खालीं वळले.

"नाहीं. किती समाधान, किती आनंद झाला आहे मला आपल्या भेटीनं!"

"तर मग सात वाजतां हं. विसरूं नकोस."

हुगो पाठ फिरवून जाऊं लागला. पण ती पुन्हा बोलूं लागली, "हुगो, इकडे ये ना जरा. मला एक चुंबन देणार नाहींस का?"

मोटारच्या दारावर व्हेर्देनें त्याला आपल्या बाहूंत कवटाळलें व त्याच्या ओठांचें चुंबन घेतलें.

* * *

संध्याकाळीं सात वाजतां काम संपवून हुगो जेव्हां स्टुडियोच्या बाहेर आला, तेव्हां रस्त्याच्या बाजूला गाडी थांबवून व्हेर्दे आपली वाट पाहात असल्याचें त्याला दिसून आलें.

ज्या ग्रांदॅल स्टुडियोंत तो मॉडेल होता तो स्टुडियो शंभर वर्षांपूर्वीच्या नॅशनल थिएटरच्या जागेंत चालू होता. नाटकांत कामें करणारे नट रंगभूमि सोडून सिनेमांत गेल्यामुळें नॅशनल थिएटर ओस पडत चाललें होतें. आणि म्हणून सरकारनें नाट्यसंस्था बंद करून थिएटरची इमारत ग्रांदॅलाला विकून टाकली होती. सरकार व ग्रांदॅल या दोघांनाही हा सौदा किफायतशीर झाला होता.

"आतां आम्ही कुठं जाणार आहों?" व्हेर्देच्या जवळ येतांच हुगो म्हणाला.

"आधीं आपण चहा घेऊं नी खूप खूप बोलूं. चहा घेतोस ना तूं?"

हुगोनें संमतिदर्शक मान हलवली नी तो मोटारींत चढला.

मोटार चालू झाली. त्याचा वर्तमानकाळ तो विसरला, नी त्याचा भविष्य-काळ मोहक रूप घेऊन त्याच्यापुढें उभा राहिला.

बापाच्या नी आईच्या अन्नावर तो जगत होता. ग्रांदॅलाच्या नोकरींत जें कांहीं त्याला मिळत होतें तें त्याच्या एकट्याच्या पोटालाही पुरण्यासारखें नव्हतें. अशा परिस्थितींत स्वतंत्र बिऱ्हाड करण्याची कल्पना त्यानें केव्हांच सोडून दिली होती आणि म्हणूनच घरकोंबड्याचें आयुष्य घालवणें त्याला प्राप्त होतें.

( हुगोच्या वयाच्या सर्वच तरुणांची स्थिति त्यावेळीं तशी होती. ) पण आजच्या एका दिवसांतील घडामोडींमुळें ही आपली अनुकंपनीय स्थिति पालटूं पाहात आहे असें त्याला वाटूं लागलें. निराशेच्या पर्जन्यानें भरलेले काळेकुट्ट ढग आशेच्या आनंदी, जिवंत प्रकाशकिरणांनीं वितळूं लागल्याचीं सुचिन्हें त्याला दिसूं लागलीं. व्हेर्देच्या स्कंधावर अनंत काळपर्यंत मस्तक टेकून आपला दुःखभार हलका करावा, असा मोह त्याला पडला. तिच्या कणखर छातीचा आधार आपल्या यातनामय आयुष्याला कायमचा लाभला आहे, नी कांट्याकुट्यांनीं भरलेल्या, अज्ञात अशा भविष्यकालीन जीवनपथावरून आपल्या संसाराची मोटार आतांच्याप्रमाणेंच मोठ्या कौशल्यानें ती हाकीत आहे, अशा तऱ्हेचें मनोहर चित्र त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें.

...पण हें सर्व स्वप्न तर ठरणार नाहीं ना? तिच्या वयाच्या इतर तरुण पोरींप्रमाणें आपल्यांशीं कांहीं काळ प्रणयाचे खेळ खेळून, एखाद्या मधमाशीप्रमाणें आपल्या कौमार्याचा रस चाखून, तारुण्यांत प्रवेश केल्यामुळें मोकाट सुटलेल्या मस्त वासनांची रग जिरवून, नी प्रेमचेष्टितांत दिलेल्या वचनांना हरताळ फासून ती आपली फसवणूक तर करणार नाहीं ना?...ही कल्पना मनांत येतांच हुगोच्या हृदयाचा थरकांप झाला. त्याच्या डोळ्यांच्या पापण्या सताड उघडल्या. नी तो विस्फारल्या डोळ्यांनीं व्हेर्देकडे पाहूं लागला.

त्याच्या मनांत कोणत्या विचारांचें वादळ उठलें आहे हें त्याच्या डोळ्यांवरून व्हेर्देला समजून चुकलें. आपल्या धुंद नेत्रांनी तिनें त्याच्याकडे पाहिलें. फुलांची कोमलता तिच्या विशाल डोळ्यांत तरळत होती. त्याच्या लोभनीय सौंदर्यानें ती मोहून गेली होती. चाकावर एकच हात ठेवून दुसऱ्या हातानें तिनें त्याला जवळ ओढलें, आपला चेहरा त्याच्या चेहऱ्याशीं भिडविला आणि हृदयापासून निघणाऱ्या खोल खोल आवाजांत ती पुटपुटली,

" मी प्रेम करतें तुझ्यावर, हुगो! तूं माझा होशील का?"

हुगोचा चेहरा आरक्त झाला. त्याच्या ओठांतून शब्द निघाले, " मी तुझाच आहें, व्हेर्दे! माझंही प्रेम आहे तुझ्यावर.'

भावी सुखाचा ठेवा जपून ठेवण्यासाठींच जणुं हुगोची छाती अभिमानानें

फुगून गेली, अन् त्याचे डोळे आनंदातिशयानें हळुहळू मिटूं लागले.

* * *

आणि ज्यावेळीं शहराजवळच्या 'कांपु ग्रांदि' या मुद्दाम राखलेल्या जंगलांतील सरोवराकांठच्या तंबूंत असलेल्या विश्रांतिस्थानांतून तीं परत फिरलीं त्यावेळीं रात्रीचे अकरा वाजले होते. त्या चार तासांच्या कालावधींत व्हेर्देनें पोर्टवाइनचे पेल्यांवर पेले रिकामे केले होते, नी सिगारेटच्या थोटकांनीं रक्षापात्र भरून गेलें होतें. हुगोनें मात्र दूध घातलेल्या चहाचे दोन-तीन कप तेवढे घेतले होते. लग्नाचीं बोलणीं पुरीं झालीं होतीं. आणि पुढील आयुष्याचे बेतही याच ठिकाणीं ठरले होते.

त्यावेळीं पोर्तुगालनें अमेरिकेचें सहीसही अनुकरण केलें होतें. विवाहाला बंधनें नव्हतीं, निमंत्रणें नव्हतीं, विवाहपूर्व विशिष्ठ मुदतीची गरज नव्हती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं हुगो ग्रांदॅलाला आपला राजीनामा पाठविणार होता. अकरा वाजतां विवाहनोंदणी ऑफिसांत जाऊन—साक्षीदारांशिवाय, अनावश्यक अभिष्टचिंतनात्मक भाषणांशिवाय तीं लग्न लावणार होतीं. दुपारीं कॉस्त दु सॉल येथें तीं एक चक्कर टाकणार होतीं, आणि पॅलेस हॉटेलमध्यें जागा घेऊन कायम राहाण्याची सोय करणार होतीं.

मोटार हुगोच्या दाराशीं येऊन थांबली. एकमेकांचा निरोप घेतांना व्हेर्देनें एक चेक खरडला नी तो त्याच्या हातीं दिला.

"तुला कांहीं विकत घेण्याची गरज लागली तर हा राहूं दे तुझ्याजवळ."

आणि अत्यंत कृतज्ञतापूर्वक हुगोनें पुढें केलेल्या ओठांचें चुंबन घेऊन ती पुढें म्हणाली,

"यांतला एक शब्दसुद्धा एवढ्यांत तुझ्या आईवडिलांना सांगायचा नाहीं हं. आपला नवा संसार थाटल्यावर त्यांना लिहायला भरपूर वेळ मिळेल तुला."

लेखक—आऽगूस्तु द कॉस्त

अनुवादक—भा. द. खातोस्कर

# प्रेमाचे तीन प्रयोग.

## I

आतांपर्यंतच्या त्याच्या आयुष्यांत फ्लोरेंसियु नाचायला शिकला नव्हता. कधीं कधीं आपल्या खोलींत एकटाच बसला असतांना त्याला या गोष्टीचें फार वाईट वाटे. अशा वेळीं कुणी पाहात नाहींसें पाहून तो आरशांत बघे आणि मनांत म्हणे, "मला नाचायला आलं असतं तर बरं झालं असतं का? एखाद्या आधुनिक तरुणीचं प्रेम संपादन करायचा नृत्य हा एकच राजमार्ग आहे का? कारण या पोरींना आयुष्यांत नृत्याशियाय दुसरं कांहिही प्रिय नसतं." पण त्याचबरोबर त्याला असेंही वाटे कीं इतिहास आणि वाङ्मय यांना वाहिलेलें आपलें आयुष्य नाचासारख्या क्षुल्लक गोष्टींत खर्च करणें मूर्खपणाचें आहे.

फ्लोरेंसियु तरुण होता. हुषार होता. बुद्धिमान होता. पण त्याचबरोबर पुस्तकांतला किडा होता. आपल्या अभ्यासिकेंत बसून इतिहास आणि वाङ्मय-विषयक गूढ प्रश्नांचें संशोधन करणें त्याला मनापासून आवडे. नृत्याच्या दिवाण-खान्यांत जाऊन एखाद्या सुंदर पण अप्रबुद्ध नी असंस्कृत पोरीला कवटाळून वाद्यांच्या तालावर पायांची कसरत करणे त्याच्या वृत्तीला मानवत नसे. त्याच्या-सारख्या उच्च अभिरुचीच्या नी अपवादात्मक विशिष्ट आवड असलेल्या माणसाला पुस्तकांच्या—विशेषतः जुन्या पुराण्या पुस्तकांच्या सहवासांत जो आनंद होई तो सोडून इतर सामान्य माणसांच्या सामान्य जीवितांतील आनंदाची इच्छा करणें त्याला बाष्कळपणाचें वाटे. पण असें असूनही जीविताचा अत्यंत साधा प्रश्न समोर उभा राहिला म्हणजे फ्लोरेंसियु अतिशय भित्रा बने. पुष्ट वृक्षाला वेढून टाक-णाऱ्या रानवेलीप्रमाणें त्याच्या धीरगंभीर स्वभावाला स्त्रीसहवासाच्या भीतीनें वेष्टून टाकलें होतें. अशा परिस्थितींत त्याचें लग्न होणें शक्य होतें का?

## II

तरीही आपल्या विवाहाच्या बाबतींत फ्लोरेंसियु आशावादी होता. केव्हां ना केव्हां तरी आपल्यावर प्रेम करणारें माणूस पुढें येईल नी आपल्या आयुष्याला पूर्णता येईल अशी त्याला आशा वाटे.

फ्लोरेंसियु तरुण होता, शरीरानें भरदार होता, एका भिंगाचा चष्मा वापरीत असल्यामुळें त्याचा चेहरा रुबाबदार दिसत होता. स्त्रियांना मोह पाडणारें शारीरिक सौंदर्य त्याच्यापाशीं खासच होतें. प्रेम करणें त्याला जमत नव्हतें. पण लग्न होण्यासाठीं पूर्वी सहज झालेल्या नाजुक ओळखी दृढ करण्याचा प्रयत्न करणें जरूर आहे हें त्याला कळत होतें. या दृष्टीनें भावि काळांत येणारी पहिली संधि साधून साध्या ओळखीचें स्नेहांत, नी स्नेहाचें प्रेमांत रुपांतर करून पाहाण्याचा प्रयत्न करण्याचें त्यानें ठरविलें. आणि थोड्याच दिवसांत त्याला तशी संधि मिळालीही. एक नव्हे...दोन नव्हे...तीन! प्रयोगासाठीं मिळणाऱ्या तीन संधि! प्रेमाचे एकंदर तीन प्रयोग केले त्यानें.

## III

ज्या वृत्तपत्राच्या रविवारच्या आवृत्तींत फ्लोरेंसियु वाङ्मयीन टांचणें लिहीत होता त्या वृत्तपत्राच्या कचेरींतील टेलिफोनवर असलेल्या मुलीवर त्यानें स्नेहदृढीकरणाचा पहिला प्रयोग केला. टेलिफोनवर टेलीफोन करून त्या मुलीला तो बेजार करून सोडूं लागला. जें जें मनांत येई तें तें तो बोलून टाकी. प्रियाराधनाच्या तंत्रांत तो अनभिज्ञ होता. प्रेमाची कबुली देतांना कोणते शब्द वापरावेत याची त्याला कल्पना नव्हती. दृढ परिचयानें प्रेम वाढतें इतकेंच त्याला माहीत होतें आणि टेलिफोन–संभाषण हें परिचय दृढ करण्याचें त्याच्या दृष्टीनें एक साधन होतें.

टेलिफोनच्या दुसऱ्या बाजूकडूनही त्याला उत्तेजन मिळे. आणि दिवसेंदिवस या टेलीफोन–संवादाचा आवाज नी हार्दिकता अधिकाधिक वाढे.

असेच कांहीं दिवस गेले. आणि एक दिवस फ्लोरेंसियुनें तिला एकत्र फिरायला जाण्याबद्दल विचारलें–अर्थात् तेंही टेलीफोननेंच.

टेलीफोन–तरुणीनें त्याची विनंति मान्य केली आणि ठरल्याप्रमाणें केस-

प्रसाधकाच्या दुकानांत तो तिला भेटायला जाण्यासाठीं निघाला. येथूनच तीं बरोबर फिरायला जाणार होतीं.

टेलीफोन–तरुणीचें प्रेम म्हणजे काय चीज असते याचा अनुभव तो आतां घेणार होता. प्रेमसोपानाची पहिली पायरी तो आतां चढणार होता.

दुकानांत शिरतांच तो चकित झाला. एका टेलीफोन–तरुणीऐवजी दोन टेलीफोन-तरुणी त्याची वाट पहात होत्या. ही दुसरी तरुणी त्याच्या मैत्रिणीची मैत्रीण होती. त्यांची गांठ रस्त्यांत अकस्मात पडली होती. आणि त्या मैत्रिणीला वाटेला लावणें प्रयत्न करूनही तिला शक्य झालें नव्हतें.

फिरायला जायचा प्रश्न काढायला त्याला आतां भीति वाटूं लागली. आणि गार्‍रें हॉटेलमध्यें एकीच्या ऐवजीं दोघींच्या जेवण्याचें बील त्याला त्याच भीतीमुळें द्यावें लागलें.——त्याचें सुदैव म्हणूनच त्यांनी 'पालासियु ओतॅल दु इस्तोरील' हें महागडें हॉटेल निवडलें नाहीं.——जेवण झाल्यावर ज्यावेळीं घरीं जाण्याची त्यांनीं इच्छा दर्शविली त्यावेळीं त्याच भीतीनें त्यानें संमति दिली. आणि मोटार ठरवून त्या दोन टेलिफोन-तरुणी आंत केव्हां बसल्या, आपल्याला रस्त्यावर सोडून नी आपला निरोप घेऊन त्या केव्हां निघून गेल्या हें सुद्धा त्या भीतीमुळेंच त्याला समजलें नाहीं. इतकेंच नव्हे तर तिच्यावरील आपल्या प्रेमाचा अर्थ त्या टेलिफोन–तरुणीनें काय केला असावा हें समजून घेण्याइतकेंही त्याचें डोकें त्या विशिष्ट भीतीमुळेंच ठिकाणावर राहिलें नाहीं.

## IV

फ्लोरेंसियुनें जो दुसरा प्रयोग केला तो एका विवाहित युवतीवर. ती नुकतीच भर ज्वानींत आली होती. स्त्री-पुरुषसंबंध, प्रेम, इ. बाबतींत तिचे विचार जुनाट, बुरसट नसून उदार होते. प्रतिष्ठित समाजांतील एका विशिष्ट वयाच्या तरुण पुरुषांशीं तिचें वर्तन अत्यंत लाघवी, आपलेपणाचें होतें. तिचें हृदय फारच प्रेमळ होतें.—तरुणांविषयींच्या प्रेमानें तें भरून राहिलें होतें.

फ्लोरेंसियुला तिच्याविषयीं आपुलकी वाटूं लागली. तिलाही त्याच्याबद्दल आपुलकी वाटली. हळुहळू आपुलकीचें उष्णतामान वाढत होतें. परंतु त्याला आपली

आपुलकी प्रगट करण्याचा धीर होत नव्हता.

एक दिवस ती वेळ आली. तिनें आपला नाजुक गोरापान पाय त्याच्यापुढें केला, नी बुटाची लेस बांधण्याची त्याला विनंति केली. लेस बांधतां बांधतां आल्जेसच्या वेळेवर फिरायला जाण्याबद्दल त्यानें तिला सुचविलें.

किनाऱ्यावर ओढून ठेवलेल्या एका भल्या मोठ्या नौकेच्या सावलींत त्यांनीं गप्पा गोष्टी करीत किती तरी वेळ घालवला. भाषणें झालीं, संभाषणें झालीं. कोट्या झाल्या, विनोद झाला. परंतु मनांतल्या अगदीं आंतल्या गोष्टी उघडपणें बोलण्याचा धीर भित्र्या फ्लोरेंसियुला झाला नाहीं.

शेवटीं मोठ्या कष्टानें, सर्व गात्रें मुठींत आणून फ्लोरेंसियु प्रेमाचे दोन लाडे लाडे शब्द बोलणार तोंच त्याच्या पायाच्या पोटरीला कसल्या तरी उष्ण वस्तूचा स्पर्श झाला, नी पोटरीखालून धूर निघूं लागला. त्यानें वाळूंत नुकत्याच टाकून दिलेल्या जळत्या सिगारेटच्या थोटकानें त्याच्या विजारीला भोंक पडलें होतें नी ती जळत होती.

विजारीप्रमाणेंच त्याचें हृदय विद्ध झालें होतें नी तेंही धगधगत होतें. पण विजारीला नी हृदयाला लागलेली ही आग उघड करून दाखविण्याचा त्याला धीर होत नव्हता. कसली तरी भीति त्याला मागें खेंचीत होती.

त्याची विजार नी त्याचें हृदय दोन्ही तशींच जळत राहिलीं.

## V

तिसऱ्या वेळीं व शेवटीं त्याला खरें प्रेम म्हणजे काय याचा अनुभव आला. खरें प्रेम, सात्विक प्रेम, स्वर्गीय प्रेम, रोमँटिक प्रेम—ज्या प्रेमांत हृदय हेंच सर्वस्व वाटतें, नी हृदयाशिवाय जगांतल्या इतर सर्व वस्तु तुच्छ वाटतात, तें हार्दिक प्रेम !

इस्तोरील क्लबमध्यें त्यानें तिला पाहिली. सोनेरी केंसाची ती एक गोंडस नी सुंदर तरुणी होती. उमलत्या पुष्पाप्रमाणें टवटवीत, मनानें प्रेमळ, डोळे बोलके नी मधाप्रमाणें गोड, ओठ पिकल्या चेरीप्रमाणें लाल. फ्लोरेंसियुनें तिला पाहिलें मात्र. त्याच्या हृदयांत कसेंसेंच झालें. त्याला तिच्याबद्दल कांहीं तरी वाटूं लागलें.

ह्या खेपेला त्याच्या यशाची त्याला खात्री वाटूं लागली. आनीजश उघड्या

अंत:करणाची, लाघवी, आनंदी, उत्साही होती. ज्या ज्या वेळीं तो तिला भेटायला जाण्याचें ठरवी, त्या त्या वेळीं आपल्या मनाला तो जोरानें सांगे, " आज—आज अगदीं खास !" आणि अगदीं निश्चयपूर्वक तो तिला भेटायला जाई. पण ती भेटली म्हणजे हें उसनें अवसान फार वेळ टिकत नसे. आणि प्रेमाच्या गोष्टींशिवाय जगांतल्या इतर सर्व विषयांवर बोलून तो परत फिरे. अन् अशा प्रत्येक वेळीं आनींजशच्या मनांत त्याच्याबद्दल जी सहानुभूति, जें आकर्षण उत्पन्न झालें होतें त्याची धार कमी होई.

" कां बरं तो बोलत नाहीं ?" आनींजश स्वत:च्या मनाला प्रश्न करी. प्रत्येक वेळीं अधिकाधिक बिकट होत जाणारें कोडें तिला उलगडतां येईना. फ्लोरेंसियुच्या एका प्रश्नानेंच तिच्या प्रश्नाचें उत्तर तिला मिळालें असतें. पण...

आणि इकडे फ्लोरेंसियु आपल्या मनाला धीर देत आपल्याशींच म्हणत होता, " आज—आज अगदीं खास."

## VI

आणि एका शुभ रात्रीं फ्लोरेंसियु बोलला. थरथरत्या हातांनीं हातमोजे काढीत नी ते चुरगळीत कंपित स्वरांत तो म्हणाला,

"...त्या पलीकडच्या खोलींतून मी तुझ्याकडे पाहात होतों...मला कांहीं बोलायचं होतं तुझ्याशीं..."

" ......?"

" माझ्या आयुष्याचं पुढं काय होणार आहे मला कांहीं समजत नाहीं. माझं जीवन बरबाद झालं आहे. होती नव्हती ती पुंजी वडिलांनी खलास करून टाकली. दिवसेंदिवस माझी परिस्थिति बिघडत जात आहे. आणि या जाणीवेच्या इंगळ्यांनीं माझं शरीर पोळून निघत आहे. मी लहरी बनत चाललों आहें, असं माझं मलाच वाटूं लागलं आहे."

थोडा वेळ थांबून फ्लोरेंसियु पुन्हा बोलूं लागला,

" हें पाहा आनींजस, मला एक गोष्ट सांग. लग्न करण्यासाठी माणसाची किती मिळकत असावी लागते ?"

" हें ज्याच्या त्याच्या राहाणीवर अवलंबून असतं. पुष्कळ मिळविणारेही संसार करतात, थोडं मिळविणारेही करतात."

" महिन्याला दोन कौंत मिळवितों मी. नी वडिलार्जित इस्टेटीचे मला आणखी दोन कौंत मिळतात. इतकं पुरे आहे का संसाराला ? "

आनींजशला वाटलें तो उन्मादक क्षण आतां जवळ येत चालला आहे. शेवटीं फ्लोरेंसियु आपलें प्रियाराधन करणार आणि म्हणणार, 'लाडके, माझं प्रेम आहे तुझ्यावर. तूं माझ्याशीं लग्न करशील का ?' आणि मग आपल्या शिरावरील ओझं दूर होऊन आपण त्याला उत्तर देणार ! 'माझंही प्रेम आहे तुझ्यावर. तूं म्हणशील तेव्हां लग्नाला तयार आहें मी.' पण उघडपणें ती म्हणाली,

" चार कौंत ना ? इतक्या मिळकतीनं सुखाचा होईल संसार. पण कां बरं हें विचारतोस तूं ? तुझा स्वतःचा तर लग्न करायचा विचार नाहीं ना ? "

आणि या प्रश्नाने फ्लोरेंसियुच्या मानसिक दौर्बल्यावर आघात झाला, तो गोंधळला, गडबडला, नी क्षणाचाही विलंब न लावतां उत्तरला,

" अं...अं...नाहीं ! लग्न ? मी ? छे, छे !...अजून विचार केला नाहीं मी लग्नाचा. नाहीं. नाहीं. नाहीं. "

आनींजश विस्फारल्या नेत्रांनी त्याच्याकडे पाहात राहिली. तिला त्याच्या नकाराचा अर्थच समजेना. तिचें कोडें जास्तच गुंतागुंतीचें झालें.

आणि फ्लोरेंसियु ! आनींजशच्या गोंडस हातांनीं उघडलेलें प्रेमस्वर्गाचें द्वार फ्लोरेंसियुनें उच्चारलेल्या त्रिवार नकाराच्या किल्लीनें त्यानें कायमचें बंद करून टाकलें होतें.

लेखक—आव्गूश्तु द कौश्त
अनुवादक—बा. द. सातोस्कर.

# अंधारांतून प्रकाशाकडे

अमावास्येच्या त्या भीषण मध्यरात्रीं मार्सेलीन आपल्या मोडकळीस आलेल्या घरांतून एकटीच बाहेर पडली. ती रात्र सप्टेंबर महिन्यांतली होती. आकाशांत काळेकुट्ट ढग सैरावैरा धावत होते. जमिनीवर अंधार अक्राळ विक्राळ स्वरूपांत व्यापला होता. आसमंतांत पसरलेली भयाण शांतता जीवाचा थरकांप करून सोडणारी होती.

मार्सेलीनचीं पावलं घाईघाईनें पडत होतीं. लोकरीच्या वस्त्रांत गुंडाळून घेतलेलं कसलंसं बोचकं हृदयाशीं धरून ती जात होती. डोंगराच्या कडाकडांतून फुटणाऱ्या रस्त्यानं नदीकडे जाण्याचा तिचा रोख दिसत होता.

अजस्र राक्षसांच्या प्रेतांच्या सांगाड्याप्रमाणं मोटमोठाले खडक इतस्ततः पसरले होते अन् त्यामधून ती वाट जात होती. परंतु मार्सेलीन निधड्या छातीनं आपला मार्ग आक्रमीत होती. कसलं तरी महत्वाचं उद्दिष्ट पार पाडण्याबद्दलची एकमेव तळमळ तिच्या चेहऱ्यावर प्रतीत होत होती.

रातकिड्यांचं ओरडणं त्या भयाण शांततेंत अधिकच भेसूरता निर्माण करी.

मार्सेलीन कांवरीबावरी होऊन दबकत दबकत चालली होती. आजुबाजूस असलेले लहान मोठे खळगे, काळेकभिन्न खडक, आकाशाच्या पार्श्वभागावर उठावदारपणं दृग्गोचर होणारीं झाडं, या सगळ्यावर आपली भिरभिरती नजर अस्थिर मनानं टाकीत ती जात होती. जणुं, त्या अचेतन वस्तु सचेतन होऊन आपला पाठलाग तर करणार नाहींत ना ? असा विचित्र विचार तिच्या डोक्यांत येत असावा.

मधुनमधून कसल्यातरी भीतीनं तिच्या हृदयाचा थरकांप होई. तिच्या मस्तकांत चाललेले विचार मोकाट सुटत अन् क्षणभर ती जिथल्यातिथं निश्चल उभी राही.

पण दुसऱ्याच क्षणीं स्वतःचा मानसिक तोल ती सांवरून घेई, जोरजोरानं होत असलेला श्वासोच्छ्वास आंतल्या आंत कोंडून धरी अन् फिरून चालूं लागे. तिच्या नसानसांतून वहाणारं रक्त अशा वेळीं अधिकच जोरानं उसळ्या मारी.

दोन्ही हातांत अलगदपणं धरून नेत असलेल्या बोचक्यांतून जेव्हां अस्पष्ट, सूक्ष्म ध्वनि निघे अन् त्याची नाजूक हालचाल होई तेव्हां मार्सेलीनचं वक्षस्थळ वाढत्या वेगानं वरखालीं होई; ओठांची थरथर वाढे अन् पाऊल अडखळूं लागे.

"गप्प रहा...गप्प रहा..." अतिशय हलक्या आवाजांत मार्सेलीन मग बोले. जीवाची तिळमात्र भीति न बाळगतां करूं पहाणारं हें धाडस, कुणाचीही कां होईना चाहूल लागून विफल होईल हा विचारसुद्धां तिचं हृदय आरपार भेदून जात होता. म्हणून अतिशय हळुवारपणं तिनं तें बोचकं थोपटलं, कुरवाळलं अन् फिरून काळजीच्या स्वरांत म्हटलं,

"गप्प रहा...गप्प रहा हं..."

कुठं कुठं जरीचे बारीक ठिपके असलेल्या काळयाभोर मखमलीप्रमाणं वाटणाऱ्या आकाशांतून तारकांचा क्षीण प्रकाश ढगांच्या गर्दीतून पृथ्वीवर उतरला होता. सगळा निसर्ग अतिशय गाढ निद्रेंत आज बुडून गेला आहे कीं काय असं वाटण्याइतपत जिकडे तिकडे भयानक, निगूढ स्तब्धता पसरली होती. नाहीं म्हणायला कुठं कुठं होणारी नदीच्या पाण्याची सळसळ नि पाणचक्कीच्या लाकडाच्या चाकाची होणारी घरघर तेवढीच काय ती त्या स्तब्धतेचा भंग करी.

डोंगराच्या अगदीं कड्याजवळ पोंचतांच मार्सेलीन थांबली. तिनं हातांतलं बोचकं मऊ हिरवळीवर काळजीपूर्वक अलगद ठेवलं अन् आपण त्याच्याजवळ बसली.

आतांपयतच्या मानसिक नि शारीरिक श्रमानं ती अगदीं गळून गेली होती. तिचा श्वासोच्छ्वास जोरानं होत होता.

अंमळशानं तिनं तें बोचकं थरथरत्या हातांनीं मांडीवर घेतलं अन् कसल्या तरी विचारांत ती गढून गेली.

मूठ वळवलेला इवलासा हात हलकेच त्या बोचक्याबरोबर हलूं लागला. अन् लागोपाठ क्षीण रडण्याचा आवाज त्या बोचक्यांतून निघूं लागला. त्याबरोबर

विचाराच्या भोवऱ्यांत सांपडलेली मार्सेलीन चटकन् भानावर आली. वस्तुस्थितीची जाणीव तिला तीव्रतेनं झाली. कमालीच्या आर्ततेनं ती पुन्हां म्हणाली,

" गप्प रहा बाळ...माझ्या लाडक्या प्राणा !... "

इतकं बोलून तिनं त्या बोचक्यांत गुंडाळून आणलेल्या, अर्ध्या तासापूर्वी या जगांत अवतीर्ण झालेल्या एका मुलाला उचलून मांडीवर घेतलं, दुधानं उतूं पहाणाऱ्या आपल्या पुष्ट स्तनाजवळ धरलं अन् असीम कारुण्यानं ती म्हणाली,

" क्षमा कर...माझ्या प्राणा, मला क्षमा कर ! ...बेअब्रू अन् निरनिराळीं दुःखं यांतून मी मुक्त होण्यासाठीं या जगांतून तूं कायमचा नाहींसा होणं जरूर आहे."

तो इवलासा जीव अखेरचं स्तनपान करीत असतांना मार्सेलीनला आपल्या आयुष्यांतले अवर्णनीय आनंदांत घालवलेले प्रेमप्रसंगांचे ते गोड दिवस आठवले. मागचा सगळा इतिहास तिच्या अंतःचक्षूंपुढं चित्रित होऊं लागला.

त्यावेळीं मार्सेलीनच्या तारुण्याचे गुलाब उमललेले होते. अन् प्रेमाचे तारे चकाकत होते. सौंदर्य नि मोहकता या जीवनाच्या फक्त दोनच बाजू तिला दिसत होत्या. चकाकतं तेवढं सोनं मानण्याकडे तिची प्रवृत्ति होती–ते दिवस फिरून कधीं कधीं येणं शक्य नव्हतं—पावलूच्या तिच्यावरील नितांत, निस्सीम प्रेमाची गोड स्मृति अजूनही तिचं अंतःकरण फुलवीत होती. बिचारी मार्सेलीन भाबडेपणानं पावलूचे प्रेमाचे बोल जीवाचे कान करून आपल्या हृदयसंपुटांत सांठवीत असे. त्याच्या वचनांवर, आणाशपथांवर डोळे मिटून ती विश्वास ठेवीत आली होती. आपल्या प्रेमलाभानं तो अपार सुखी झालेला पाहून मार्सेलीनला अतिशय धन्यता वाटे. अन् त्यानं आपणापासून कधींच दूर होऊं नये, म्हणूनच कीं काय ती त्याला प्रेमभरानं आपल्या बाहुपाशांत घेऊन हृदयाशीं आवळून धरी अन् त्याचा चेहरा चुंबनांनीं भरून टाकी.

कुणाच्याशा लग्नप्रसंगीं त्यांची एकमेकांशीं ओळख झाली. व्हायोलीन वाजवणारा पावलूसारखा कलावंत त्या गांवांत दुसरा नव्हता. वादनावरील असामान्य प्रभुत्वानं लग्नाच्या मैफलींत एका उत्कृष्ट गायकाला त्यानं चीत करून सोडलं होतं. लग्नाला हजर असलेल्या शेंकडों पुरुष व स्त्रिया त्याच्या वादनकौशल्याची मुक्त कंठानं तारीफ करूं लागल्या. मार्सेलीनचं हृदय तर व्हायोलीनच्या तारांनीं केव्हांच

विद्ध करून सोडलं होतं.

पावलूची मजबूत उंच शरीरयष्टी, किंचिन्मात्र सांवळा रंग, निळसर सावलीवत् वाटणारी ल्हानशी दाढी, भावनिदर्शक काळेभोर विशाल डोळे, हें सगळं तरुण पोरींना धुंद करून सोडण्यास नि मोहविण्यास पुरेसं होतं.

मार्सेलीनच्या प्रेमाच्या नाटकाच्या पहिल्या अंकास तेव्हांपासून सुरवात झाली. पावलू तिचं सर्वस्व होऊन बसला. त्यांच्या प्रेमाचा वसंतकाल बहरला होता. त्यांना जगाची विस्मृति पडली होती.

मार्सेलीनच्या सान्निध्यसुखासाठीं पावलूनं रात्रीच्या रात्री डोळे सताड उघडे ठेवले होते. तिन्हीसांजच्या वेळीं रस्त्यावरील लोकांची रहदारी बंद झाल्यानंतर बागेच्या फाटकाजवळ उभा राहून मार्सेलीनशीं बोलतांना तासचेतास चटकन् कसे निघून जात याचं त्याला विषादपूर्ण आश्चर्य वाटे.

केवळ मार्सेलीनला डोळे भरून पहाण्यासाठीं रात्रीच्या वेळीं गर्द झाडाझुडपांतून, खांचाखळग्यांनीं भरलेल्या आडवाटेनं, जीवजिवाणूंची फिकीर न करतां वादळी वाऱ्यांतसुद्धां तो तिच्याकडे धांव घेई. अलोट प्रीतीच्या धुंदींत अंध होऊन करणं शक्य असलेलं हें धाडस पाहून मार्सेलीनचं हृदय कृतज्ञतेनं कांठोकांठ भरून येई. त्याच्या सहवासांत तासचे तास एकांतांत रहातांना तिचं देहभान हरपे, तिला स्वत्वाचा विसर पडे, तिची वृत्ति प्रेमस्वरूप होई.

आपलं भावी वैवाहिक जीवनाचं चित्र कल्पनेच्या कुंचल्यानं रंगवतांना बिचारीला कल्पना सुद्धां कधीं शिवली नसेल कीं, आपल्यापुढं थोड्याच दिवसांनीं कडवट विषाचा पेला चालून येणार आहे!

तिच्या वृद्ध बापाला हळुहळु तिच्या या प्रेमसंबंधाचा सुगावा लागल्याशिवाय राहिला नाहीं. तो जितका प्रेमळ तितकाच भयंकर संतापी अन् करारी बाण्याचा होता. घराण्याच्या अब्रूबद्दलची त्याची कल्पना फार कठोर होती.

एके दिवशीं आपले जाड जाड भुवयांनीं आच्छादलेले डोळे मार्सेलीनच्या नजरेशीं भेदकपणं भिडवीत तो तिला म्हणाला,

हें पहा, तुझ्या प्रेमसंबंधाची कुणकुण माझ्या कानावर आली आहे. पण त्याबद्दल मी तुला मुळींच दोष देत नाहीं. कारण तुझं वयच आहे हें!...पण

संभाळ हं !...मेंदू शाबूत ठेवून वाग......"

"पपा, मजवर आपला विश्वास आहे ना ?"

"पोरी, विश्वास आहे म्हणूनच तुझ्याबद्दल विशेष काळजी मी वागवीत नाहीं...पण फिरून सांगतों कीं कोणत्याही प्रसंगीं बुद्धि चळूं देऊं नकोस. ही माझी दाढी " गर्वभरानं तो ती कुरवाळीत पुढं म्हणाला, "नेहमींच समाजांत सन्मानानं मिरवली आहे. तिची बेअब्रू करूं पहाणारा प्राणी जिवंत रहाणं शक्य नाहीं कधीं ! ऐकलंस ? "

बोलतां बोलतां म्हाताऱ्याच्या डोळ्यांतून अग्नीचे स्फुल्लिंगच उडताहेत असं वाटूं लागलं. कपाळाच्या शिरा तट्ट फुगल्या. ओठ थरथरूं लागले. क्षणभर थांबून तो पुढं म्हणाला,

"माझ्या ह्या हातांनीं मी त्याला ठार करीन त्यावेळीं सैतान किंवा देव पुढं आला तरी त्या प्राण्याचं रक्षण होणं शक्य नाहीं."

त्याच्या प्रत्येक वाक्याला विलक्षण धार होती. स्वतःच्या व त्याहीपेक्षां स्वतःच्या घराण्याच्या इभ्रतीला कलंक लागणारी गोष्ट घडूं पहात असल्यास बोल- लेला शब्द खरा करण्यास तो किंचिन्मात्र मागंपुढं पहाणारा नव्हता. आपल्या अब्रूवर उडालेले डाग एकुलत्या एक पोटच्या पोरीच्या रक्तानं धुवून काढल्या- शिवाय तो कदापि रहाणं शक्य नव्हतं. आणि हें सत्य मार्सेलीन पूर्णपणं ओळखून होती.

पण सरळहृदयी पावलवर तिचा पराकाष्ठेचा विश्वास होता. कुठल्यातरी निवांत जागीं अंधारांत किंवा चांदण्याच्या सौम्य प्रकाशांत पावलशीं तासचे तास बोलत असतांना विश्वासघाताची अशुभ कल्पनाही तिच्या मनाला कधीं शिवली नाहीं. पावलच्या वक्षस्थळावर विश्वस्तपणं मान टेकतांना, आपला देह सर्वस्वी त्याच्या हवालीं करतांना कसलाच प्रतिकार करण्याचं तिला कधीं आठवलं नाहीं. जीवाभावानं निरपेक्ष उत्कट प्रेमाचा आपल्या वल्लभावर अविरत वर्षाव करणं या पत्नीधर्मापलिकडे अन्य कोणतीच भावना तिला ठाऊक नव्हती.

तथापि एखादेवेळीं पावलच्या खांद्याकर मस्तक टेकवून सहज गंमतीदाखल आत्यंतिक जिव्हाळ्यानं अनुनयाच्या स्वरांत ती त्याला म्हणे,

"जर का तूं कधीं काळीं माझा त्याग करशील तर त्याचक्षणीं माझं जीवितकार्य कायमचं संपलं असं समज."

"तुझा अन् त्याग? किती वेडी आहेस ग तूं?"

"पण दुर्दैवानं तसं झालं तर क्षणभरही हा देह ठेवणं मला शक्य नाहीं." मार्सेलीन सद्गदित होऊन अश्रुपूरित नेत्रांनीं उद्गारली. त्या अशुभ कल्पनेनंच तिच्या हृदयाचा थरकांप झाला. तथापि पावलूच्या प्रतिकारात्मक गोड शब्दांनी तिचं हृदय त्याचबरोबर सुखावल्याशिवाय राहिलं नाहीं.

"खूळ लागलंय कीं काय तुला, मार्सेलीन? मरणाच्या अभद्र गोष्टी अशा वेळीं कां बरं बोलतेस तूं? आपल्या लग्नासंबंधी कांहीं तरी सांग ना!"

"तर मग मी तुला नेहमींच हवी ना माझ्या लाडक्या? लग्न करणार आहेस ना तूं माझ्याशीं?" हर्षनिर्भर स्वरांत लाडीकपणं हसून मार्सेलीन म्हणाली.

"म्हणजे मी काय लग्न करणार नव्हतों तुझ्याशीं? तुला काय वाटलं?"

असेच कांहीं दिवस गुजरल्यानंतर एके रात्रीं मार्सेलीननं आपल्याला दिवस गेल्याचं पावलूला बोलतां बोलतां सूचित केलं. आणि आपल्याला मातृत्व प्राप्त होणार या सुमधुर भविष्याबद्दल आपलं आतां तो पवित्र चुंबन घेणार या अपेक्षेनं ती त्याजकडे पाहूं लागली.

पण तिची ही अपेक्षा बाजूलाच राहिली. उलट तिचं तें बोलणं ऐकतांच त्याचा चेहरा खर्रकन् उतरला. तो शुष्कपणं म्हणाला,

"काय?...गरोदर राहिलीस तूं?...अर्रे...हें काय आणखी अनपेक्षित लचांड!"

"लचांड कां म्हणून पावलू?"...मार्सेलीन पांढरी फटक होऊन उद्गारली, "तूं वारंवार अभिवचनं देत होतास त्याप्रमाणं लग्न करणार आहोंत ना आपण?"

"हो तर!..."

"तर मग विलंब न लावतां इतर तयारीला लागायचं ना?"

"तें तर उघड आहे..."

"हें पहा पावलू, ह्या गोष्टीची बिलकूल वाच्यता होतां कामा नये हं! जर का म्हणून याचा सुगावा पपाला लागला तर माझा व तुझा प्राण घेतल्याशिवाय

कधींही रहायाचा नाहीं तो ! ”

“ माझा कां म्हणून ? ” असं म्हणून पावलनं आपले खांदे बेपर्वाईच्या नि तुच्छतेच्या आविर्भावानं उडवले अन् तो पुढं म्हणाला,

“ हें पहा, मी कांहीं एखादं कोंबडीचं पिल्लं नव्हे, चटकन् उचलून मान मुरगळायला !...हं...! ”

“ पण तूं...”

“ माझ्या आंगाला नुसता हात लावूं पहाणाराला लाथेच्या ठोकरीसरशीं मी उडवून देईन. येऊं दे कोण वाचावीर येतो तो !”

“ हें पहा पावल, माझ्या पूज्य वडिलाबद्दल असली भलती सलती भाषा कां बरं वापरतोस तूं ? अतिशय लहानपणीं माझी आई वारली अन् त्यानंतर तळहातावरील फोडाप्रमाणं वागवून मला पपानं लहानाची मोठी केली...माझ्या मागल्या जीवावरच्या दुखण्यांत रात्रीच्या रात्री उशीलगत बसून माझी शुश्रुषा करतांना पपाच्या सुरकतलेल्या चेहऱ्यावरून गळणारे अश्रू अजून माझ्या डोळ्यासमोर उभे रहात आहेत...माझा पपा...”

बोलता बोलतां वेगवेगळ्या दुःखद भावनांच्या आवेगानं मार्सेलीनचा गळा भरून आला. ती हुंदक्याहुंदक्यानीं रडूं लागली. परिणामाच्या भावी भेसूर कल्पनेनंच तिचं हृदय फाटून जाऊं लागलं. सगळीकडे तिला अंधार दिसूं लागला.

पण पावल चटकन् शुद्धीवर आला. आपल्या पशुतुल्य वर्तनाची, बेजबाबदारपणें उधळलेल्या मुक्ताफळांची त्याला शरम वाटली. त्यानें चटकन मार्सेलीनला आपल्या जवळ ओढली अन् तिच्या डोळ्याचं प्रदीर्घ चुंबन घेत अनुनयाच्या स्वरांत तो म्हणाला,

“ मार्सेलीन, क्षमा कर मला ! रागाच्या तिरीमिरीसरशीं मी कांहींतरीच बरळून गेलों. हें पहा, आपल्याला हव्या आहेत कशाला इतर गोष्टींची चर्चा ? आपलं लग्न तर दोन तीन आठवड्यांतच आपण उरकून घेणार. होय ना ? ”

पावलच्या प्रेमाच्या फुंकरीनं मार्सेलीनच्या हृदयाकाशांत जमलेले चिंतेचे ढग कुठच्याकुठं वाहून गेले. तिचा चेहरा क्षणार्धांत हंसतमुख झाला. पावलच्या खांद्यावर तिनं मान टेकली अन् म्हटलं,

" माझ्या लाडक्या प्राणा ! "

यानंतर कांहीं आठवडे गेले; महिने गुजरले. परंतु आपलं वचन पाळण्याचीं पावलूचीं चिन्हं बिलकूल दिसेना. तो आतां मार्सेलीनच्या भेटी वरचेवर टाळूं लागला. आणि कधीं काळीं भेट झालीच तर कोणत्यातरी व्यवहारांत आपण गढून गेलों असल्याचं तो भासवूं लागला. हळुहळू मार्सेलीनचा त्याच्या कपटनाटका-बद्दलचा संशय बळावत गेला. एके दिवशीं पूर्ण एकांतांत त्याच्या गळ्यांत आपले हात अडकवून आकांतानं स्फुंदस्फुंदत ती त्याला म्हणाली,

" पावलू, माझं रक्षण कर...मला राख आतां !...माझ्या पोटांत फिरणाऱ्या या तुझ्या बाळासाठीं तरी मला जगूं दे ! माझ्या प्राणा, तुला माझी दया येऊं दे !"

" अरे वा: ! मार्सेलीन, मी तुला कधीं तरी नकार दिला आहे का ? "

" नकार दिला नाहींस...पण..."

" हें पहा मार्सेलीन, असल्या गोष्टी तडकाफडकी करून भागायचं नाहीं. अगदीं जपून पावलं टाकीत आपलं उद्दिष्ट गांठलं पाहिजे."

आणि शेवटीं मार्सेलीनला एक दिवस कळून चुकलं कीं पावलू ब्राझीलला —आपणापासून शेकडों कोस दूर कायमचा निघून गेला आहे.

मार्सेलीनची स्थिति केविलवाणी झाली. तिच्या हृदयाच्या चिंधड्या उडाल्या होत्या. पण सगळं दु:ख आंतल्या आंत ती गिळून टाकीत होती. मुक्तकंठानं रडून दु:खभार हलका करण्याचं समाधानही तिच्या आवाक्यांतलं नव्हतं. तथापि रात्रीच्या वेळीं अंथरुणावर पडल्या ठिकाणीं तिला भावनावेग असह्य झाला म्हणजे तिच्या डोळ्यांतून अश्रूंची धार लागे. करुण वाणीनं ती मग वर पाहून म्हणे,

" माझ्या स्वर्गस्थ ममा ! आतां तूंच माझी आठवण कर ! शक्य तितक्या लवकर तुझ्याकडे मला ने ! पपाला माझं हें रहस्य कळण्याच्या आधीं माझा एकदांचा शेवट लाव."

लांबच लांब नि रुंद जाड फडक्यानं ती आतांशा आपलं पोट झग्याच्या आंत आंवळून बांधूं लागली. आपल्या बरोबरीच्या मैत्रिणींना टाळून ती एकटी एकटी राहूं लागली. कुठं घराबाहेर जायचंच झालं तर रहदारीचा सरळ रस्ता

सोडून, अडचणीच्या आडवाटांनी ती जाऊं लागली. शक्य तों आनंदी नि हंसतमुख राहून दु:खाचा वडवानल लपवण्याचे तिचे प्रयत्न सुरू झाले. गोड गोड गाणीं मोठ्यानं म्हणत राहून आपण मजेंत असल्याचं नाटक करून ती जगाला दाखवूं लागली.

पण ज्या ज्या वेळीं ती आपल्या बापाजवळ असे त्या त्या वेळीं पपाच्या चहऱ्याचा ती सूक्ष्मपणं धडधडत्या अंत:करणानं अभ्यास करी अन् त्याची नेहमीची वृत्ति कायम असल्याचं पाहून ती समाधानाचा हलकेच सुस्कारा सोडी व स्वत:शींच म्हणे,

" जर का माझ्या दुर्दैवानं पपाच्या लक्षांत येऊं नये ती गोष्ट आली तर तो मला एखाद्या कुत्र्याच्या मोलानं ठार करण्यास केव्हांही मागं पुढं पहाणार नाहीं. अन् त्यावेळीं कुणीही मला सोडवणं शक्य नाहीं. "

रिकाम्या वेळीं कसलंतरी शिवणकाम घेऊन बसण्याचा ती फार्स करी. आणि मनांतल्या मनांत करुण वाणीनं मृत्यूची आराधना चालवी. विश्वस्तपणानं ज्याच्या हातांत गळा दिला त्यानंच त्यावर वस्तरा फिरवावा हा दाहक अनुभव तिचं हळवं हृदय होरपळून टाकीत होता. आपलं उसळ्या मारणारं नितांत भाबडं प्रेम या सगळ्या अनर्थाचं कारण व्हावं अन् अशी दारुण शिक्षा आपल्याला मिळावी हा विचार तिला असह्य होत होता.

" परमेश्वरा ! माझे हे हाल आणखी किती दिवस बरं लांबणार आहेत ? सगळ्यांना हवीं हवीं असणारीं माणसं चुटकीसरशीं या जगांतून कायमचीं नाहींशीं होतात अन् मी ह्या दावानलांत अजून होरपळतच आहें. देवा ! माझी आठवण तुला नाहीं का होत ? "

एके रात्रीं तिला फारच थकवा वाटूं लागला. लवकरच ती झोंपी गेली. थोड्याच वेळानं ती चटकन् जागी झाली. हळुहळू विलक्षण वेदना तिच्या पोटांत होऊं लागल्या. ती कॉटवर उठून बसली. त्या वेदना तिला असह्य होऊं लागल्या. डोळ्यावरची झोप पार उडाली. डोळे सताड उघडे झाले. देहाची तळमळ वाढली. आपलं जोराचं कण्हणं बाहेर ऐकूं येईल म्हणून तिनं जवळच्या चादरीचा बोळा घट्ट तोंडांत धरून ठेवला.

"हाच तो क्षण!" ती तशाच स्थितींत स्वत:शीं पुटपुटली, "आतां थोड्याच वेळानं सगळं जग मला धिक्कारील. देवा! या प्रसंगीं फक्त तूंच माझ्या रक्षणार्थ धांव!"

कपाळावर आलेले तिचे केस घामानं भिजून चिंब झाले. दोन्हीं हातांचीं बोटं तिनं एकत्र जुळवून तीं गादीवर दाबून धरलीं. तोंडाभोवतीं हातरुमाल घट्ट लपेटून बांधला अन् उशींत तोंड खुपसून ती कण्हूं लागली. शेजारच्या खोलींत झोंप-लेल्या बापाला चाहूल लागून तो जागा होईल या भीतीनं तिची ही सगळी धडपड आकांतानं चालली होती.

कांहीं तास अशा स्थितींत गेले. नंतर मार्सेलीननं अत्यंत आर्ततेनं एक दोन मिनिटं भयंकर स्थितींत गुदमरून चित्कार केले अन् लवकरच ती शांत, शांत झाली. मघांपासून होणाऱ्या वेदनाचा उच्चबिंदु गांठून ती आतां मुक्त झाली. एका गोजिर-वाण्या मुलाला तिनं जन्म दिला होता.

पांच दहा मिनिटं ती तशाच काळोखांत निपचित पडून राहिली. तिनं दिवा लावला नाहीं. मुलाचा मुखचंद्रमा एकवार पहाण्याची अनिवार लालसा तिनं जिथल्यातिथं दाबून धरली. मऊ मऊ उबदार मांसाचा स्पर्श तेवढा तिच्या हातांना जाणवला. त्या स्पर्शानं तिच्या हृदयांत विलक्षण, अननुभूत संवेदना निर्माण झाल्या.

मार्सेलीन चटकन् उठून उभी राहीली. एका लांब वस्त्रानं तिनं आपला देह पूर्णपणं वेष्टून टाकला. त्या नूतन अर्भकाला हातालगत मिळालेल्या चिरगुटांनी गुंडाळलं नि एका लोकरीच्या शालींत त्याला झांकून घेतलं. अन् बिलकूल आवाज न करतां एकेक पाऊल उचलीत ती घराच्या बाहेर पडली.

अत्यंत क्षीणतेनं नि अस्थिर मनानं ती चालत होती. पण एक विलक्षण अदृश्य शक्ति तिला चैतन्य देत होती. आपल्या अब्रूचं मातेरं करणारा हा जिवंत पुरावा कायमचा नाहींसा केला म्हणजे मग आपल्याला कसलीच भीति नाहीं हा विचार तिला शक्ति देत होता अन् तिचीं पावलं भराभर पडत होतीं.

ह्या सगळ्या रोमांचकारी पूर्वेतिहासाचा चित्रपट मुलाला पाजतांना तिच्या डोळ्यासमोर येऊन गेला.

स्तनापासून वेगळा करतांना मार्सेलीननं मुलाला क्षणभर आपल्या बाहुपाशांत

# काल तूं कां आला नाहींस ?

माझ्या प्रेमा,

तूं काल कां आला नाहींस ? सगळी संध्याकाळ मी तुझी वाट पहात राहिलें. घटका लोटत होत्या, तसतसं माझं हृदय अलोट दुःखानं भरून येत होतं. तरीही निराश न होतां मी तुझी मार्गप्रतीक्षा करीतच होतें. आपल्या कामाच्या व्यापांत गुंतलेला असल्यामुळं तूं दुसऱ्या दिवशी आल्याशिवाय राहात नाहींस हें मला पक्कं माहीत आहे. अन् तूं आलास म्हणजे आपल्या चुंबनांनी मला माझ्या उद्विग्नतेचा विसर पाडतोस आणि आनंदाच्या भरांत तूं काल कां आला नाहींस असं विचारायचं भान देखील मला राहात नाहीं.

तुला अधिक काय सांगूं ? मला बरं वाटत नाहीं. म्हणूनच मी तुला आतां लिहायचं ठरवलं होतं. कांहीं दिवस किती अपार विषण्णतेनं भरलेले असतात ! कधीं कधीं सूर्यप्रकाश आमच्या खिडकींतून आंत येत असतांना माझ्या मनांत अशुभाची पाल चुकचुकत असे. त्या वेळीं घड्याळावर निश्चल झालेली माझी नजर न हलवतां मी सारखी रडत बसें.

मला क्षमा कर. तूं उद्यां येशील अन् मी अद्याप दुःखी आहें म्हणून मला वेडी खुळी म्हणशील. तुझ्या सान्निध्यानं त्या वेळीं मी स्वतःला भाग्यवान् समजेन. खरंच, तुझ्याशिवाय मला जगांत कोण आहे ? माझ्या जीवितापेक्षांही तूं मला अधिक प्रिय आहेस. माझ्या जीविताचं तूं एकमेव कारण आहेस.

उद्यांची सकाळ सुंदर उजाडली तर आपण दूरवर फिरायला जाऊं. किती तरी दिवस आम्हीं बरोबर फिरायला गेलों नाहीं, नाहीं का ? उद्यां मात्र जायचंच हं ! तुझ्या हातांत हात घालून सगळी वाट मी हंसत हंसत चालेन अन् तुला हंसवीन अशी मला उमेद आहे. कधीं कधीं मी तुझ्याशीं बोलत असतांना तूं

इतकं बोलून मार्सेलीननं त्या डोंगराच्या उंच कड्यावरून एकदम आपलं शरीर झोकून दिलं.

धप् ...असा पूर्वीपेक्षांही मोठा आवाज झाला...थोडा वेळ बुडबुडे आले अन् फिरून जिकडे तिकडे शांत...शांत...

लेखक—जुआंव आव्हि
अनुवादक—व्यं. अ. पै रायकर

# काल तूं कां आला नाहींस ?

माझ्या प्रेमा,

तूं काल कां आला नाहींस ? सगळी संध्याकाळ मी तुझी वाट पहात राहिलें. घटका लोटत होत्या, तसतसं माझं हृदय अलोट दुःखानं भरून येत होतं. तरीही निराश न होतां मी तुझी मार्गप्रतीक्षा करीतच होतें. आपल्या कामाच्या व्यापांत गुंतलेला असल्यामुळं तूं दुसऱ्या दिवशीं आल्याशिवाय राहात नाहींस हें मला पक्कं माहीत आहे. अन् तूं आलास म्हणजे आपल्या चुंबनांनीं मला माझ्या उद्विग्नतेचा विसर पाडतोस आणि आनंदाच्या भरांत तूं काल कां आला नाहींस असं विचारायचं भान देखील मला राहात नाहीं.

तुला अधिक काय सांगूं ? मला बरं वाटत नाहीं. म्हणूनच मी तुला आतां लिहायचं ठरवलं होतं. कांहीं दिवस किती अपार विषण्णतेनं भरलेले असतात ! कधीं कधीं सूर्यप्रकाश आमच्या खिडकींतून आंत येत असतांना माझ्या मनांत अशुभाची पाल चुकचुकत असे. त्या वेळीं घड्याळावर निश्चल झालेली माझी नजर न हलवतां मी सारखी रडत बसें.

मला क्षमा कर. तूं उद्यां येशील अन् मी अद्याप दुःखी आहें म्हणून मला वेडी खुळी म्हणशील. तुझ्या सान्निध्यानं त्या वेळीं मी स्वतःला भाग्यवान् समजेन. खरंच, तुझ्याशिवाय मला जगांत कोण आहे ? माझ्या जीवितापेक्षांही तूं मला अधिक प्रिय आहेस. माझ्या जीविताचं तूं एकमेव कारण आहेस.

उद्यांची सकाळ सुंदर उजाडली तर आपण दूरवर फिरायला जाऊं. किती तरी दिवस आम्हीं बरोबर फिरायला गेलों नाहीं, नाहीं का ? उद्यां मात्र जायचंच हं ! तुझ्या हातांत हात घालून सगळी वाट मी हंसत हंसत चालेन अन् तुला हंसवीन अशी मला उमेद आहे. कधीं कधीं मी तुझ्याशीं बोलत असतांना तूं

मला उत्तर करत नाहींस अन् आपल्याच विचारांत मग्न असतोस. मी तुझं चुंबन घेतें त्याची तुला दादही नसते. माझ्यापासून एकादं रहस्य तूं लपवून ठेवीत आहेस का? हें बरं नाहीं असं नाहीं का तुला वाटत? मी सर्वस्वी तुझीच ना? तुझ्या प्रेमाचा मी अभिमान वाहतें ना?

उद्यां तूं इथं आलास म्हणजे कांहीं दिवसांपासून तूं असा उदासीन कां असतोस तें मला कळलं पाहिजे. मग उद्यां येशील ना तूं? तुला सांगण्यासारख्या कितीतरी गोष्टी हृदयांत बाळगून अन् तुझ्यावर चुंबनांचा वर्षाव करण्यासाठीं अनावर होऊन सबंध संध्याकाळ तुझी वाट पाहात राहाणं किती कठीण आहे याची तुला कल्पनाही नसेल! आमचं मीलन होऊन एक वर्ष लोटलं. पण जणुं तें महिन्यापूर्वीच झालं आहे असं मला वाटतं. तो दिवस देखील मी विसरून गेलें होतें. त्या संध्याकाळीं तुला सुंदर दिसावं म्हणून एक पुष्पगुच्छ मी माझ्या कंबरपट्ट्यांत खोंवला होता, त्याची तुला आठवण आहे का? त्या दिव्य अविस्मरणीय आनंदाच्या क्षणानंतर त्या गुच्छांतलं एक फूल आमच्या मीलनाच्या स्मृतिदाखल भिंतीवर लावण्यासाठीं मी निवडून काढलं. नंतर भिंतीवर माझ्या वेड्यावांकड्या हस्ताक्षरांत तारीख लिहिली. तुला हंसूं आलं. त्या गडबडींत मी मेजावर माझी पिन विसरलें होतें. ती घेऊन तूं तें फूल उचललंस आणि फुलझाडांच्या आकृती चितारलेल्या एका कागदाला तूं हलकेच टोंचलंस. नी मग तूं हंसून म्हटलंस, "पिन! एका वर्षाच्या सुखी आयुष्याचं प्रतिक!" आणि मी वेड्याप्रमाणें तुझं चुंबन घेतलं नी हृदयाच्या तळमळीनं तुला म्हटलं, "नाहीं......एका वर्षाचं नव्हे! सबंध आयुष्याचं!"

कालच वर्ष पुरं झालं. तूं कां बरं आला नाहींस काल?

तुझी
×××

* * *

जुआंव,

मी वेडी तुला कां बरं लिहीत आहें, मला कांहींच कळत नाहीं. या पत्राचा तरी काय उपयोग? माझ्या किती तरी पत्रांना तूं उत्तरं केली नाहींस. आतां तर

तुझ्या बेपर्वाईचं कारण मला कळून चुकलं आहे.

तुझं आतां लग्न व्हायचं आहे. हें असं होणार असं मला कधींच वाटलं नव्हतं. मी स्वतःला सर्वस्वी तुझी नी तूं माझा आहेस असं समजत होतें. नी म्हणूनच एक दिवस तुला कायमचा रामराम ठोकण्याची पाळी येईल असं मला वाटलं नव्हतं. ती बातमी ऐकून तुझ्या मृत्यूचंच वर्तमान कळावं एवढा माझ्या हृदयावर आघात झाला. कितीतरी दिवस मला कांहीं सुचत नव्हतं, कांहीं रुचत नव्हतं. जणूं काय माझ्या हृदयाचा धागा तुटल्यासारखाच झाला होता.

माझ्या लाडक्या, झाल्यागेल्या गोष्टींचा मी आतां विचार केला तेव्हां मला असं दिसून आलं कीं तूं केलंस तें बरोबर होतं. मी तुला अपात्र होतें. रस्त्यावरील एका बोळांत तुझी माझी पहिली भेट झाली. मला काय किंमत होती ? पतिता होतें तेव्हां मी एक. तूं मला आजच्या स्थितीला आणलंस. माझं मन, माझ्या भावना, माझं हृदय तूं फुलवलंस, आणि तुझी झाल्यानंतर जें जीवन मी जगलें त्यावरून मला अशी आशा वाटली कीं तुझ्या आयुष्यांत मी कोणतं तरी कार्य करूं शकेन. माझी ती केवढी मोठी चूक होती तें मला आतां कळून येतं.

परंतु धीर धर. यापुढं माझं दर्शन तुला होणार नाहीं. पश्चात्तापाच्या टोंचणीशिवाय तूं मला विसरून जाऊं शकशील. पण माझं काय ? माझ्या आयुष्याचं पुढं काय होणार आहे ? मला कळत नाहीं. या महिन्यांत जें कांहीं घडलं आहे, त्यामुळं मी खूप सोसलं आहे. आणि माझ्या अंगीं आतां कोणतीच शक्ति राहिलेली नाहीं. गेल्या तीस रात्री मी आलोचन जागरणं करून काढल्या आहेत. पण त्याचं तुला काय होय ? अन् मी तरी तुला आतां हें कां लिहितें ? तूं सुखी होत आहेस. ती तुझ्यावर मनापासून प्रेम करते. होय ना ? तुझ्यावर प्रेम करणार नाहीं अशी स्त्री जगांत असेल का ? माझ्या लाडक्या ! अन् तूं देखील तिच्यावर प्रेम करीत असशील. खरंच, तुला ती फार आवडते, नाहीं का ? आमच्या शेवटच्या कांहीं भेटींत तूं तिच्यासंबंधानं विचार करीत होतास, होय ना ? माझ्या प्रश्नाचीं तूं उत्तरं देत नव्हतास, आणि चुंबनाचीही तूं पर्वा करीत नव्हतास त्याचं कारण आतां माझ्या लक्षांत आलं. तिनंच तुझ्या हृदयांत प्रवेश केला होता. . किती सुंदर असेल ती मुलगी ! ....

मला क्षमा कर. मी तिला पाहिली आहे. तिला पाह्यची मला फार फार इच्छा होती. अन् सुदैवानं किंवा दुर्दैवानं हातांत हात घालून प्रेमी युगुलाप्रमाणं फिरतांना मी तुम्हांला पाहिलं. माझ्या अंगावरून तुम्ही निघून गेलां. अन् एका दरवाजापाशीं तुम्हांला आडून पाहात मी तिथं उभी होतें तें तुम्हाला कळलं सुद्धां नाहीं. तुझ्या दृष्टींत तिची दृष्टि मिळून गेली होती. तिच्या हातांत तुझा हात गुंफला होता. एकाच प्रेमानं तुमचीं हृदयं भरून आलीं होतीं. अन् मी उंबरठ्याखालीं दाराला घट्ट धरून उभी होतें. तरीही तुझ्या हृदयाला, तुझ्या शरीराला माझ्या अस्तित्वाची जाणीव झाली नाहीं. त्या वेळीं मला असा भास झाला कीं तुझ्या हृदयापासून मी किती तरी दूर आहें. आणि त्याक्षणीं मला तीव्रतेनं असं वाटलं कीं यापुढं साऱ्या साऱ्याला मी मुकलें आहें. मला एवढंच समाधान वाटतं कीं तूं सुखी होत आहेस. तुझ्या प्रेयसीचा मला मत्सर वाटत नाहीं. ती पवित्र आहे. आणि मी तुझी झालें तेव्हांपासून मीही पवित्र ठरलें.

आदिउश.

× × ×

* * *

माझ्या प्रिय मित्रा,

तूं कां बरं आला नाहींस ? दिवसभर तुझीं पावलं कानावर आल्याचा मला भास होऊन मी दाराशीं धांवलें. पण व्यर्थ ! आतां माझी खात्री झाली, तूं येणार नाहींस. पण कां ? तूं दुःखी आहेस का ? मग तुझ्या दुःखांत तूं इतरांना भागीदार कां नाहींस करीत ? माझं अमर प्रेम तुझं शांतवन करण्यासाठी मी तुझ्या पायांशी समर्पण करणार होतें. माझं दुःख मी स्वतःशींच अंधारांत भोगलेलं आहे. त्यावरून मला असं वाटतं कीं आपल्या यातना पाहून हळहळणारं हृदय आपल्या सोबतीला असण्यासारखं दुसरं भाग्य नाहीं. कालची आमची भेट किती आश्चर्यकारक होती. तुला काळ्या पोषाखांत व इतका दुःखी पाहतांच मी कल्पना केली कीं ती मेली असेल. अरेरे ! माझ्या निराधार प्राणा, माझ्या लाडक्या, तूं माझ्याकडे पाहिलं देखील नाहींस ! बागेंतील एका बांकावर बसून उदासवाण्या नजरेनं खेळांत दंग

होऊन गेलेल्या मुलांच्या एका घोळक्याकडे तूं बघत होतास. तुझ्या अपार दारुण व्यथेची कल्पना मला त्याच वेळीं आली. त्या मुलांची गोड किलबिल ऐकत असतांना जें स्मित तुझ्या मुखावर झळके त्या स्मिताच्या सावलींत नी तुझ्या नजरेच्या प्रेमळ प्रकाशांत मला तुझ्या उदास आयुष्याचं प्रतिबिंब दिसलं. आणि जिच्यावर तूं एवढं प्रेम केलंस तिनं आपल्यामागं एखादा आशादायक धालजीव ठेवला नाहीं याबद्दलचा शोकही मला त्या प्रतिबिंबांत दिसला. म्हणूनच मी तुझ्याजवळ गेलें. तूं मला नीट ओळखलं नाहींस. मी आतां म्हातारी झालें आहें. मला त्याची जाणीव आहे. म्हणून मी आरशांत देखील पाहात नाहीं. तुझ्या वियोगाचं दुःख आणि निर्वाहासाठीं भीक मागूं नये म्हणून या वर्षी सोसलेले कष्ट यामुळं वीस वर्षांनीं मी म्हातारी झालें आहें. आणि ज्या या शरीरावर तूं अनावर प्रेमलीलांचा वर्षाव केलास तें माझं शरीर एखाद्या सावलीप्रमाणं झालं आहे. मी तुझ्याशीं बोलत असतांना तूं माझ्यावर जी आनंदी नजर टाकलीस ती पाहून माझ्या दुःखाचं परिमार्जन झालं. तेव्हांपासुन एकाच कल्पनेनं मी स्वतःचं समाधान करून घेतलं. तुझ्या निराधार स्थितीमुळं माझा सहवास तुला चिरकाल आनंदाचा ठेवा होऊं शकेल आणि माझ्याकडे तूं आशादायक नजरेनं पाहाशील हा खोटा भरंवसा मी बाळगला. पण तूं कांहीं आला नाहींस. मला पाहिल्यानं तुला जो आनंद झाला त्यामुळं तुझं दुःख यत्किंचित्‌ही कमी झालं नाहीं. आतां माझ्या सहवासाची इच्छा करणं म्हणजे तिच्या स्मृतीला कलंक लावण्यासारखं आहे, असंच तुला वाटत असावं. आज तूं मला भेटायला येणार असं सांगितलंस. आमच्या गत प्रेमाच्या सगळ्या स्मृती ज्या खोलींत इतस्ततः पसरलेल्या आहेत त्या खोलींत आमची भेट होणार होती. इथं या खोलींत कांहींच बदललेलं नाहीं. या रक्षापात्रांत तुझ्या शेवटच्या सिगरेटचं थोटुक तें पाहा तसंच पडलेलं आहे. फुलदाणींत मला अर्पण केलेल्या शेवटच्या फुलांचे देठ अजून दिसत आहेत. आणि तूं इथं येशील नी हें सगळं पाहाशील हें ऐकून माझा आनंद अनावर झाला होता. मी घरांत शिरलें नी माझं हृदय मोकळं करण्याकरतां मी ओरडलें, "तो परत येणार ! परत येणार !" माझ्या भोवतालचं सारं कांहीं आनंदानं नाचूं लागलं.

त्या रात्रीं मी झोंपलें नाहीं. सकाळ होतांच मी डोळे उघडले, आणि घड्या-

ळाकडे एकसारखी पाहूं लागलें. तें घड्याळ तूं मला भेट म्हणून दिलं होतंस. नी त्या घड्याळांत किती आनंदाचे ठोके वाजत होते ! तो काळ परत कधीं येणार ? ते संथ कांटे सावकाशपणें कितीदां तरी फिरले. अधून मधून जिन्यांत वाजलेल्या पावलांच्या चाहुलीनं माझं सर्व शरीर थरारत होतं. तासामागून तास पळत होते.

शेवटीं तूं येत नाहींस अशी खूणगांठ मी मनाशीं बांधली.

आतां मला कसलीच आशा राहिली नाहीं. पण माझं तुझ्यावर किती किती प्रेम आहे. मला वाटतं कीं तूं इथं न येऊन चूक केलीस. इथं आला असतास तर तुझा दुःखभार हलका झाला असता. तुझ्या हृदयाला विरंगुळा मिळाला असता. प्रेम करणाऱ्या स्त्रीच्या हृदयांत शांतवन करणारा आईचा प्रेमळपणा वास करीत असतो.

लाडक्या, कां बरं तूं आला नाहींस ?

× × ×

लेखक—**आंद्रे ब्रुन**
अनुवादक—**' परिचित '**

# स्त्रियांचीं पत्रें

लेखक या नात्यानें माझ्या आयुष्यांत शेंकडो स्त्रियांचीं पत्रें मला आलीं आहेत, माझी अशी समजूत आहे. हें सांगतांना गर्वाचा अंशही मला शिवलेला नाहीं. मी मला स्वतःला जितका ओळखतों, त्यावरून मी असें म्हणू शकतों कीं माझी व्यक्तिशः ओळख होण्याची संधि या स्त्रियांना मिळाली असती, तर त्यांपैकीं पुष्कळांनीं मला पत्रें लिहिण्याचें धाडस केलेंच नसतें. कितीदां तरी, आपल्या आवडत्या लेखकाचें पुस्तक वाचतांना, त्याच्या वाङ्मयाच्या आधारानें आपण त्याची बौद्धिक मूर्तिच तेवढी घडवतों असें नसून, त्या लेखकाची प्रत्यक्ष, सावयव अशी मूर्तिहि—त्याचें तोंड, त्याचे डोळे, त्याचा चेहरा, त्याचें हास्य, त्याची हॅट, त्याच्या हातमोजांचा रंग—आपण कल्पनेनें पाहात असतों. पण ज्या वेळीं प्रत्यक्ष त्याच्या हाडामासांचा देह आपण पाहातों त्या वेळीं किती दारुण निराशा होते आपली !

तें कसेंही असलें तरी मला आलेल्या स्त्रियांच्या सर्व पत्रांचीं बंडलें १८ व्या शतकांतील एका जुन्या पेटींत मी जपून ठेवलीं आहेत. हीं सर्व पत्रें मी लिस्बोअ व पोर्तु येथील वृत्तपत्रांच्या कचेरींत काम करतांना मला आलेलीं आहेत. कुभांडापासून स्मितापर्यंत सर्व कांहीं या पत्रांत आहे. कांहींत फुलपांखराच्या पंखासारखें कोमल नी हळवें स्त्रीहृदय माझ्यावरील आपल्या प्रेमाची कबुली देतें, तर कांहींत तेंच स्त्रीहृदय एकाद्या क्रूर जनावराप्रमाणें वाघांच्या डोळ्यांनीं पाहात व मांजराच्या नखांनी ओरबाडीत मला दूर लोटतें नी माझा धिक्कार करीत मला शिव्याशाप देतें. पण त्या सगळ्या पत्रांतून तलवारीप्रमाणें असो किंवा फुलाप्रमाणें असो, दगडाप्रमाणें असो किंवा हिऱ्याप्रमाणें असो, आढून पाहाणारी, पुटपुटणारी, बोलणारी, हंसणारी, आणि प्रतारणा करणारी एकच स्त्री दिसून येते.

जी लहानशी हकीकत मी आतां सांगणार आहें, ती मनोरंजक तर आहेच

पण तिच्यापासून बोधही घेण्यासारखा आहे.

कांहीं वर्षांपूर्वी पोर्तु येथील एका वृत्तपत्रांत मी साप्ताहिक बातमीपत्रें लिहीत होतों, त्या वेळची गोष्ट. याच शहरांतून मला एका अज्ञात व्यक्तीकडून पत्रें येऊं लागलीं. तीं निळ्या कागदावर लिहिलेलीं असत. लिलाक रंगाच्या लाखेनें लिफाफा बंद केलेला असून, व्हायोलेट फुलाच्या सुगंधानें सगळें घर भरून टाकील असा सुवास त्या पत्रांतून दरवळत असे. लिस्बोअच्या 'सकाळ' पत्राच्या पत्त्यावर हीं सर्व पत्रें येत—त्या वेळीं याच वृत्तपत्रांत मी भरपूर लिहित असें.—"सुंदर तरुणी (Loira adora'vel)" या सहीनें तीं येत. पहिल्या पत्राला मी फारसें महत्त्व दिलें नाहीं. दुसऱ्या पत्राचीही तीच गत झाली. परंतु तिसऱ्या, चौथ्या, पांचव्या पत्राच्या वाचनानें माझ्या मनांत एक प्रबल उत्सुकता जागृत झाली. दारुण निराशेचा हा प्रारंभ होता. ही 'सुंदर तरुणी' कोण असेल !

अकस्मात एक नवें पत्र आलें आणि रहस्याला सुरवात झाली. ही 'सुंदर तरुणी' आतां विकाराच्या भरांत माझ्या वाङ्मयाबद्दल आवड व्यक्त करीत होती, इतकेंच नव्हे तर माझ्या व्यक्तीवरील प्रेमही ती दर्शवीत होती. आणि आपल्या पत्रांना मी उत्तरें करावीं अशी ती याचना करीत होती. मी विचार केला. आणि पुढच्या आठवड्यांत मला पोर्तु शहरांत जावयाचें होतें, म्हणून माझ्यावर आसक्त झालेल्या या तरुणीला ज्या हॉटेलमध्यें मी उतरणार होतों, त्या हॉटेलचा पत्ता नी माझ्या प्रयाणाचा दिवस कळविला. आणि तिच्या संभाषणाचा आस्वाद मला घेतां यावा म्हणून तिनें मला भेट द्यावी अशी विनंति केली. असल्या धाडसी वर्तनामुळेंच दर्यावीर नी प्रेमवीर प्रसिद्धीला आले आहेत.

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी अंथरुणावर पडून होतों. इतक्यांत नोकरानें आंत येऊन एक बाई मला शोधायला आली असल्याची वर्दी दिली. त्यानें माझ्या हातांत एक व्हिजिटिंग कार्ड दिलें. 'मारीय क्रिस्तीन' हें नांव त्याच्यावर छापलेलें होतें. हॉटेलच्या दिवाणखान्यांत पांच मिनिटें तिला थांबायला मी नोकराला सांगितलें. आणि मी कपडे करायला लागलों. इतक्या घाईनें मी माझ्या आयुष्यांत

कधींही कपडे केलेले नव्हते. मी दिवाणखान्यांत प्रवेश केला त्या वेळीं एका तरुणीची पाठमोरी आकृति फॅशनचें एक मासिक चाळीत असल्याचें मला दिसून आलें. माझी चाहूल लागल्याबरोबर माझ्याकडे तोंड वळवून तिनें आपल्या विशाल नेत्रांनीं माझ्याकडे पाहिलें आणि विचारलें,

" तुम्हीच डॉ. ××× का ?"

मी तिला पुढें बोलूं दिलें नाहीं.

" सिंजोरा, मी डॉ. ××× नव्हे." भयभीत होऊन मी तिथून निघालों.

माझ्यावर प्रेम करणारी—माझ्यासाठीं तळमळणारी ही " सुंदर तरुणी " एक काळीं कुळकुळीत नीग्रो पोरगी होती !

तेव्हांपासून अनोळखी स्त्रियांकडून मला आलेली पत्रें मी बाळगून ठेवतों. परंतु कोणत्याच पत्राला मी कधीं उत्तर केलें नाहीं !

लेखक—**लुईश द ओलिव्हेयर गिमारांइश**
अनुवादक—' **परिचित** '

# चाळिशीचें अंतर

एक पत्र, एक पुष्पगुच्छ नी रेशमी कागदांच्या वेष्टनांत गुंडाळलेली एक छोटी पेटी घेऊन नोकरानें खोलींत प्रवेश केला. 'किकी'नें स्मित केलें नी पत्र फोडतां विचारलें,

" उत्तराची वाट पाहात आहे का ? "

" नाहीं बाईसाहेब. दुसरं कांहीं काम आहे का ? "

" हीं फुलं घेऊन जा नी माझ्या टॉयलेट रुममध्यें ठेवून दे. "

" होय. ठेवतों बाईसाहेब. "

नोकर निघून गेला. किकी सोफ्यावर पुन्हां आरामशीरपणें पहुडली, मस्तकाखालीं मऊ गिरदी घेतली, आणि अंड्यांचा रस्सा थेंब थेंब चाखल्याप्रमाणें त्या प्रेमपत्रांतील एकेक शब्दाचा स्वाद घेण्यास किकीनें सुरवात केली.

" माझ्या प्रेमा,

एका अनपेक्षित घटनेमुळं—ती कोणती तें मी तुला मागाहून सांगेन—मला आज तुझ्या घरीं येतां येत नाहीं. क्षमा करशील ना मला ? तुझ्या विवाहाला आज दोन वर्षं, तीन महिने नी पांच दिवस पुरे होतात. आजचा हा मंगल दिवस तुझ्या सहवासांत आनंदांत घालवण्याची मला किती तळमळ लागून राहिली होती म्हणून सांगूं ? पण मनुष्य योजतो एक, नी दैव घडवतं भलतंच ! मी देहानं नसलों तरी मनानं तुझ्याजवळ आहें हें विसरूं नकोस. आणि खरं म्हटलं तर या विरहप्रसंगानं आमचीं हृदयं जास्त जवळ आलेलीं आहेत, नाहीं का ? या पत्रासोबत एक पुष्पगुच्छ नी या प्रसंगाची आठवण म्हणून एक छोटीशी भेट पाठवीत आहें. तिचा स्वीकार करशील ना ? फुलांना कसली आली आहे किंमत ? तीं थोड्याच वेळांत सुकूनही जातील. पण दुसरी वस्तु मात्र बिनमोल आहे हं. कारण निरंतर ती

तुझ्या सहवासांत राहील, तुझ्या गळ्याचं, तुझ्या बाहूंचं, तुझ्या त्वचेचं तिला स्पर्शसुख मिळेल. माझ्या लाडके, आदेऊस, आतां लवकरच आपली भेट. अनंत चुंबनं.

सदैव तुझाच,
**जॉर्ज.**

किकी उठली. नी तिनें रेशमी कागदांत गुंडाळलेल्या पेटीस हात घातला. प्रियकराकडून आलेली प्रेमाची भेट हातांत घेतांना ती किती तरी लाजली. एकाद्या बाहुलीप्रमाणें मूळचेच रक्तवर्ण असलेले किकीचे कमनीय गाल अधिकच आरक्त झाले. तिनें त्या पेटीचा आधीं वास घेतला. वक्ष:स्थळ दबलें जाईपर्यंत तिला आपल्या छातीशीं कवटाळून धरलें, आणि मग अतिशय हलुवारपणें पुन:पुन्हा वेड्यासारखीं तिचीं दीर्घ चुंबनें घेतलीं.

शेवटीं तिचें स्वप्न सत्यसृष्टींत उतरलें होतें. आपल्या गुलाबी रंगाच्या गळ्याभोवतीं रुळणारा टपोऱ्या पाणीदार मोत्यांचा हार किती तरी वेळां किकीनें कल्पनेनें पाहिला होता, अनुभवला होता, हाताळला होता. एका भेटीच्या प्रसंगीं जॉर्जनें आपलें कसें चुंबन घेतलें होतें आणि मोत्यांचा एक हार आपल्याला भेट म्हणून देण्याची इच्छा कशी दर्शविली होती, त्याची किकीला आतां आठवण झाली.

आणि आज तिच्या हातांत एकाद्या सर्पाप्रमाणें दिसणाऱ्या, डोळे दिपवून सोडणाऱ्या मोत्यांच्या हाराची पेटी ती प्रत्यक्ष पाहात होती.

तिचा लाडका जॉर्ज !

विजेच्या वेगानें तिनें वेष्टन काढलें नी पेटी उघडली.

...तिच्या डोळ्यांपुढें अंधेरी आली. सर्वांग थरारून गेलें. आणि गळ्यांत हुंदक्यांनीं गर्दी केली. झटकन् तिनें सोफ्यावर अंग टाकून दिलें. तिच्या सबंध देहावर प्रेतकळा आली. हातांतली पेटी तर केव्हांच गळून पडली.

पेटींत पाणीदार मोत्यांच्या हाराऐवजीं दाढी करण्याचा वस्तरा निघाला होता !

* * *

आमोनियाच्या उपयोगानें किकीला मी शुद्धीवर आणलें. सावध होतांच मी

तिच्या बेशुद्धीचें कारण विचारणार तोंच मला विश्वासांत घेतल्यासारखें करून ती म्हणाली,

" पुरुष किती दुष्ट असतात तें पाहिलंत का तुम्ही ? नुसते दुष्ट नव्हेत. क्रूर राक्षस ! मग ते नवरे असोत किंवा प्रियकर असोत ! "

पण किकीच्या या बोलण्यांतलें मला एक अक्षरही समजलें नाहीं. मी तसें सांगितल्यावर ती म्हणाली,

" जॉर्ज माझा प्रियकर आहे.—आहे नव्हें, होता. आतां इतकं झाल्यावर मी आहे तरी कसं म्हणूं ? आमच्यांतला हा नाजुक संबंध आतां तुटलाच आहे म्हणाना ! "

" पण किकी, तुला आणखी प्रियकर होता ? " मी आश्चर्यानें विचारलें.

मादाम किकीनें स्मित केलें. पायांची हालचाल करून ते क्रॉसप्रमाणें जुळवले. आपलें सोनेरी केसांनीं युक्त असलेलें मस्तक एका निळ्या रेशमी गिरदीवर झोंकून दिलें. व खिडकींतून आंत येणाऱ्या मंद सूर्यप्रकाशांत मला आपली प्रेमकहाणी सांगण्यास सुरवात केली. ती म्हणाली,

" होय, होता. माझा नवरा दिवसेंदिवस वयानं नी वृत्तीनं जास्त जास्त म्हातारा होत चालला आहे, नी त्यामुळंच जणुं काय माझ्यांत अधिकाधिक तारुण्याचा संचार होत चालला आहे, हें मला कळून चुकलं. नुकतंच पंधरा दिवसांपूर्वी त्याच्या एका कानाच्या पाठीमागंच मुळीं ३२५ पांढरे केस असल्याचं मी मोजून पाहिलं. कार्लुशचं वयाचं म्हातारपण मला एक वेळ पतकरलं असतं. पण त्याची वृत्तीही म्हातारी होत चालली आहे. एक तऱ्हेचा जीवनाचा उबग त्याला आलेला आहे. खरोखरच आमचा विवाह म्हणजे एक दुर्दैवी घटना आहे. सुखासाठींच लग्न करायचं असतं ना ? पण मी !...हें लग्न मी केलं नव्हतं. मला सक्तीनं बोहल्यावर चढवण्यांत आलं होतं. आणि याचा परिणाम म्हणजे माझं सध्याचं दुर्दैवी आयुष्य ! निदान मला मूलबाळ असतं तर त्यांतही मी दुःखांत सुख मानून राहिलें असतें......"

" पण अजूनही तुला ही आशा आहेच कीं ! तुझं कांही वय झालेलं नाहीं..."

" तुम्हाला माहीत नसेल, माझा नवरा माझ्यापेक्षां चाळीस वर्षांनीं मोठा आहे. ही कांही फारशी आशादायक गोष्ट नव्हे. चाळीस वर्षांचं हें अंतर ! चाळीस दिवसांचं नव्हे कांही ! माझ्या वयाच्या दुपटीपेक्षांही आमच्या वयांतलं हें अंतर जास्त आहे, नाहीं का ? आणि या वयांत फक्त नातवंडं होतात नातवंडं ! तेंही सोडून द्या. निदान शब्दांचं तरी सुख आहे का मला ? कार्लुश आपल्या व्यवसाय-धंद्यांत इतका मग्न असतो, कीं दोन घटका माझ्याशीं हास्यविनोद करण्याइतकाही अवसर त्याला कधीं सांपडत नाहीं. "

" छे, छे ! अशक्य ! कांहींतरीच सांगतेस तूं. "

" गेल्या महिन्यांत जो माझा छळ झाला तो तुम्हाला समजला असता तर तुम्ही असं म्हटलं नसतं. गेल्या महिन्यांत ' व्हिस्कॉंदि द सांव जील ' च्या घरीं मी नाचाला गेलें होतें. तिथं किती भयंकर त्रास झाला मला. किती चावट लोकांनीं चिमटे घेऊन मला बेजार करून सोडलं, तुम्हांला कल्पना आहे का ? तीस. हो, तीस गुलजार पुरुषांनी माझ्या सर्वांगाला चिमटे घेतले. माझ्या जिवाचा अगदीं संताप झाला. सर्व शरीर काळंनिळं होऊन मी घरीं आलें. पण माझ्या नवऱ्यानं काय केलं असावं असं तुम्हाला वाटतं ? त्यानं माझं डागळलेलं अंग पाहिलं अन् तो हंसला. नी नुसतं आर्निक मलम घेऊन अंग जोरानं चोळण्याचा त्यानं मला थंडपणें सल्ला दिला. तें तर मी केलंच. पण कितीतरी गोष्टी त्याला सुनावल्या. तोंडाला येईल तें बोलून घेतलं. आमचं चांगलं भांडणच झालं म्हणाना त्या रात्रीं ! नाहीं, जो नवरा आपल्या बायकोचं अंग चावट लोकांनीं घेतलेल्या चिमट्यांमुळं काळं निळं झालेलं पाहूं शकतो, आणि आर्निक मलमानं चोळण्याचा सल्ला देण्यापलीकडे कांहींच करत नाहीं, तो नवरा कसला ? असला मनुष्य हा नवरा तर नव्हेच, पण मनुष्य सुद्धा नव्हे !..."

" किंवा तो चांगला केमिस्टही नव्हे ! "

" झालं. संपलं, आणखी वाट पाहाण्यांत अर्थ नव्हता. शेवटीं मी एक प्रियकर गांठला. कार्लुशचाच मित्र होता तो. आणि.... "

इतक्यांत बाहेरची घंटा वाजली. दरवाजा उघडला गेला. दारावरचा पडदा हलला. आणि काळे कपडे केलेला, गंभीर चेहऱ्याचा एक वयस्क माणूस हातांत

कसलं तरी एक पुडकं घेऊन आंत आला. येतांयेतांच मला पाहून त्यानं हात उचलला, मादाम किंकीचं एक चुंबन घेतलं नी ओठांतल्या ओठांत पुटपुटला,

" आपलं लग्न होऊन आज एक वर्ष, तीन महिने नी दोन दिवस होतात, नाहीं का किकी ? मला आपल्या लग्नाच्या तारखेची पक्की आठवण आहे. आणि त्या आठवणीचं चिन्ह म्हणून हें पाहा मी काय आणलं आहे !"

किकीनें वेष्ठन सोडून गुलाबी रंगाच्या मखमलीची पेटी उघडली, नी आंतून सुंदर मोत्यांचा एक रसरशीत हार काढला.

किकी खूष झाली. तिचें देहभान हरपलें, मुखावर उन्माद चढला, नी माझें अस्तित्वही विसरून तिनें नवऱ्याच्या गळ्याला मिठी मारली. आणि ती जवळ जवळ ओरडलीच,

" माझ्या प्रेमा, माझ्या प्राणा, माझ्या लाडक्या ! मला तूं कित्ती कित्ती आवडतोस ! "

लेखक—लुईश द ओलिव्हेयर गिमारांइश
अनुवादक—बा. द. सातोस्कर.

# सागर साहित्य प्रकाशन

| | |
|---|---|
| सागराच्या लाटा | प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई |
| गुलाब गेंद | जयवंतराव सरदेसाई |
| वादळांतील नौका | प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई |
| कुळागर | संपा.–बा. द. सातोस्कर |
| वैमानिक हल्ला | भा. वि. वरेरकर |
| तुटलेले तारे | अनंत काणेकर |
| कारंजाचे तुषार | व्यं. अ. पै. रायकर |
| किनाऱ्यावर | प्रा. वि. द. साळगांवकर |
| उंबराचीं फुलें | ह. वि. देसाई |
| दिव्यावरती अंधेर | अनंत काणेकर |
| शहाळीं | सां. घ. कंटक |
| वेलविस्तार | महादेव शास्त्री जोशी |
| तीन तरुणी | व्यं. अ. पै रायकर |
| तृष्णा | कु. नलिनी मुळगांवकर |
| तारांबळ | वि. वि. बोकील |
| मी आणि माझें लेखन | संपा.–मो. ग. रांगणेकर |
| एकादशी | भा. वि. वरेरकर |
| निशिकांतची नवरी | प्रा. अनंत काणेकर |
| आनीतेचें दिव्य | प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई |
| छायानट | ले. रमणलाल देसाई, अनु.–रत्नप्रभा रणदिवे |
| द्राक्षांच्या देशांत | संपा.–बा. द. सातोस्कर |
| जीवनासाठीं | ह. वि. देसाई |
| आई | ले. पर्लबक, अनु - बा. द. सातोस्कर |
| मीलन | सां. घ. कंटक |

सागर साहित्य प्रकाशन